॥ श्रीहरिः ॥

1275▲

# नवविधा भक्ती

## नवधा भक्ति ( मराठी )




गीताप्रेस गोरखपुर
GITA PRESS, GORAKHPUR

जयदयाल गोयन्दका

|| श्रीहरिः ||

1275

# नवविधा भक्ती

## नवधा भक्ति ( मराठी )

त्वमेव माता च पिता त्वमेव
त्वमेव बन्धुश्च सखा त्वमेव।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव
त्वमेव सर्वं मम देवदेव॥

जयदयाल गोयन्दका

॥ श्रीहरि: ॥

# अनुक्रमणिका





॥ श्रीहरिः ॥

# नवविधा भक्ती

भक्ती हे एकमेव असे साधन आहे की, जे सर्वजण सहजतेने करू शकतात आणि त्यावर मनुष्यमात्राचा अधिकार आहे. या कलियुगात तर आत्मोद्धारासाठी भक्तीसारखा दुसरा कोणताच सोपा मार्ग नाही. कारण सांप्रत स्थितीत ज्ञान, योग, तप, याग वगैरे फलद्रूप होणे कठीण आहे. शिवाय त्यासाठी लागणारी साधनसामुग्री मिळणेही अवघड आहे. म्हणून माणसाने कमर कसून फक्त ईश्वर-भक्तीचेच साधन करण्यास तत्पर असावयास हवे. विचाराअंती असे दिसते की, जगात धर्माला अनुसरणारे जितके लोक आहेत, त्यांतील बहुसंख्य लोक ईश्वरभक्तीच पसंत करतात. आता आपण विचार करावयास हवा की, हा ईश्वर कोण आहे ? आणि त्याची भक्ती म्हणजे काय ?* जो सर्वांवर शासन करतो, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सर्वान्तर्यामी आहे, न्याय आणि सदाचारच ज्याचा कायदा आहे, जो सर्वसाक्षी असून सर्वांना शिक्षा, बुद्धी आणि ज्ञान देणारा आहे आणि तिन्ही गुणांपासून अलिप्त असूनही केवळ लीलेने गुणभोक्ता आहे, ज्याची भक्ती केल्याने मनुष्य सगळे दुर्गुण, दुराचार आणि दुःखांपासून मुक्त होऊन परम पवित्र होतो, जो अव्यक्त असूनही जीवमात्रांवर दया करून जीवांचे कल्याण आणि धर्माचा प्रचार करण्यासाठी व भक्तांना आश्रय देण्यासाठी आपल्या लीलेद्वारा वेळो-वेळी देव, मनुष्य वगैरे सर्व रूपांत व्यक्त होतो, म्हणजेच साकार रूपात प्रत्यक्ष प्रगट होऊन भक्तजनांना त्यांच्या इच्छेनुरूप दर्शन देऊन आनंदित करतो आणि जो सत्ययुगात श्रीहरीच्या रूपात, त्रेतायुगात श्रीरामाच्या रूपात, द्वापारयुगात श्रीकृष्णाच्या रूपात प्रगट झाला होता, अशा प्रेममय अविनाशी विज्ञानानन्दघन सर्वव्यापी हरीसच ईश्वर समजावयास हवे.

आता भक्ती कशाला म्हणतात, याविषयी विचार करावयास हवा.

---

* याविषयी अधिक माहिती हवी असल्यास 'ईश्वर काय आहे' ही पुस्तिका मागवून बघावी. ती गीताप्रेसने छापली आहे.

महर्षी शाण्डिल्याने म्हटले आहे, 'सा परानुरक्तिरीश्वरे' ईश्वरावर परम अनुराग, परम प्रेम म्हणजेच भक्ती.

देवर्षी नारदाने भक्तिसूत्रात म्हटले आहे—'सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा' ॥ २ ॥ 'त्या परमेश्वराविषयी अत्यंत प्रेमच भक्ती आहे.' 'अमृतस्वरूपा च' ॥ ३ ॥ आणि ती अमृतरूप आहे.

अशा प्रकारे बरीच वचने आहेत. त्यावरून हाच बोध होतो की, ईश्वराविषयी जे परम-उत्कट प्रेम आहे, तेच अमृत आहे, तीच खरी भक्ती आहे. व्याकरणाच्या दृष्टीने 'भक्ती' शब्दाचा अर्थ 'सेवा' असा होतो, कारण 'भक्ती' शब्द 'भज् सेवायाम्' धातूपासून बनला आहे. म्हणून तसा अर्थ होणे उचित आहे. प्रेम हे सेवेचे फळ असून भक्तीच्या साधनाची अखेरची सीमा आहे. जसे वृक्षाची सार्थकता फळे येण्यावर आहे, तसेच भक्तीची पूर्तता आणि गौरव भगवंतावर परम प्रेम जडण्यातच आहे. प्रेम हीच त्याची पराकाष्ठा आहे आणि प्रेमासाठीच सेवा केली जाते. म्हणून वस्तुत: भगवंतावर अनन्य प्रेम असणे हीच भक्ती आहे.

वस्तुत: ईश्वरभक्तीचा अधिकार सर्व जीवांना असणे न्यायसंगत आहे. कारण हनुमंत, जाम्बवन्त, गजेन्द्र, गरुड, काकभुशुण्डी आणि जटायू वगैरे पशु-पक्षीसुद्धा भगवंतावरील भक्तीमुळे परमपदास गेले. पण मानवेतर पशु-पक्ष्यांमध्ये ज्ञान आणि साधनाचा अभाव असल्यामुळे ते ईश्वरभक्ती करू शकत नाहीत. म्हणूनच शास्त्रकार ईश्वरभक्तीसाठी मनुष्यालाच अधिकारी समजतात.

ईश्वरभक्तीत वय आणि रूपाला काहीच किंमत नाही. विद्या, धन, जात आणि बळ हेसुद्धा मुख्य नाहीत. तसेच सदाचार आणि सद्गुणांकडेही ईश्वर खास ध्यान देत नाही. ते केवळ एक प्रेम बघतात. एका कवीने म्हटलेही आहे—

**व्याधस्याचरणं ध्रुवस्य च वयो विद्या गजेन्द्रस्य का**
**का जातिर्विदुरस्य यादवपतेरुग्रस्य किं पौरुषम्।**
**कुब्जायाः कमनीयरूपमधिकं किं तत्सुदाम्नो धनं**
**भक्त्या तुष्यति केवलं न च गुणैर्भक्तिप्रियो माधवः॥**

"व्याधाचे असे कोणते चांगले आचरण होते ? ध्रुवाचे वय ते काय होते ? गजेन्द्राजवळ कोणती विद्या होती ? विदुराची कुठली उत्तम जात होती ? यादवपती उग्रसेनाचा कुठला पुरुषार्थ होता ? कुब्जेचे असे कोणते सुंदर रूप होते ? सुदाम्याजवळ कुठले धन होते ? भक्तिप्रिय माधव फक्त एका भक्तीनेच संतुष्ट होतात, गुणांनी नव्हे."

भक्तात भक्तीच्या प्रभावाने सदाचार आणि सद्गुण आपोआपच येतात; म्हणून ईश्वरभक्तीत सदाचार आणि सद्गुणांना एवढे महत्त्व नाही. अर्थात याचा अर्थ असा नाही की, ईश्वरभक्तीत सदाचार आणि सद्गुणांची आवश्यकताच नाही. जसे आजारी माणसाला बरे होण्यासाठी मुख्य औषध घ्यावेच लागते, पण त्याचबरोबर पथ्यपाण्याचीही आवश्यकता असते, त्याप्रमाणे जन्ममरणरूपी भवरोगातून सुटण्यासाठी ईश्वरभक्ती परम औषध आहे आणि सद्गुण व सदाचार पथ्य आहे. आजारी माणसाने बरे होण्यासाठी औषध घेतले, पण पथ्यपाण्याकडे लक्ष दिले नाही तर त्याचा आजार बरा होत नाही, पण सदाचार आणि सद्गुणरूपी पथ्याची कमतरता असूनही भक्तिरूपी औषध घेतल्याने भवरोगांपासून सुटका होते. कारण भक्तिरूपी औषध पथ्याचेही काम करते. एवढेच नाही तर, कुपथ्य सेवनापासून होणाऱ्या नाना दुर्गुणांचा आणि विघ्नरूपी दोषांचा नाश तसेच सदाचार-सद्गुणरूप पथ्याचे पालनही ईश्वरभक्तीमुळेच होते आणि मग रोगाचे मूळच कायमचे नाहीसे होते. म्हणूनच ईश्वरभक्ती फार मोठे औषध आहे.

भक्तीचे मुख्य दोन प्रकार आहेत. एक, साधनरूप-जिला वैध आणि नवविधा नावानेही ओळखतात आणि दुसरी साध्यरूप-जिला प्रेमा-प्रेमलक्षणा आदि नावांनी ओळखले जाते. यात सेवा साधनरूप आहे आणि प्रेम साध्य आहे.

आता याचा विचार करावयास हवा की, सेवा कशाला म्हणतात ? उत्तरादाखल असे म्हणता येईल की, ज्यामुळे स्वामी प्रसन्न होईल, संतुष्ट होईल, अशा प्रकारे त्याच्या आज्ञेनुसार आचरण करणे, म्हणजेच सेवा. शास्त्रात त्याची अनेक प्रकारची लक्षणे सांगितलेली आहेत.

तुलसी रामायणात शबरीला भगवान श्रीरामचन्द्र म्हणतात—

**प्रथम भगति संतन्ह कर संगा। दूसरि रति मम कथा प्रसंगा॥**
**गुर पद पंकज सेवा तीसरि भगति अमान।**
**चौथि भगति मम गुन गन करइ कपट तजि गान॥**
**मंत्र जाप मम दृढ़ बिस्वासा। पंचम भजन सो बेद प्रकासा॥**
**छठ दम सील बिरति बहु करमा। निरत निरंतर सज्जन धरमा॥**
**सातवँ सम मोहि मय जग देखा। मोतें संत अधिक करि लेखा॥**
**आठवँ जथालाभ संतोषा। सपनेहुँ नहिं देखइ परदोषा॥**
**नवम सरल सब सन छलहीना। मम भरोस हियँ हरष न दीना॥**

"पहिली भक्ती सत्संग, दुसरी भगवत्कथांविषयी प्रेम, श्रीगुरुचरण-कमलांची सेवा ही तिसरी भक्ती होय. माझ्या गुणगणांचे निष्कपटपणे गायन करणे ही चौथी भक्ती. दृढ श्रद्धेने माझ्या नाममंत्राचा जप करणे, ही वेदांनी सांगितलेली पाचवी भक्ती होय. इंद्रियनिग्रह, चारित्र्य, फलाशेने कर्मे न करणे आणि सद्धर्मांत नित्य तत्पर असणे, ही सहावी भक्ती. सर्व जग मद्रूप पाहणे, तसेच माझ्याहून संतांना अधिक श्रेष्ठ मानणे ही सातवी भक्ती. मिळेल त्यात समाधान मानणे आणि स्वप्नातही दुसऱ्याचे दोष न पाहणे ही आठवी भक्ती. सर्व लोकांशी कपटरहित सरळ वागणे आणि माझ्यावर श्रद्धा ठेवून अंत:करणात हर्ष-शोक न बाळगणे ही नववी भक्ती होय."

तसेच श्रीमद्भागवतात भक्त प्रल्हादाने म्हटले आहे -

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्।**
**अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्॥**

(७/५/२३)

"भगवान विष्णूचे नाव, रूप, गुण आणि प्रभाव वगैरेंचे श्रवण, कीर्तन आणि स्मरण व भगवंताची चरणसेवा, पूजन आणि वन्दन तसेच भगवंताच्या ठिकाणी दास्यभाव, सखाभाव आणि आत्मसमर्पण अशी नऊ प्रकारची भक्ती आहे."

अशा प्रकारे शास्त्रात भक्तीची निरनिराळी अनेक लक्षणे सांगितलेली आहेत. परंतु विचार केल्यास असे दिसते की, सिद्धांतात काही फरक नाही. सगळ्यांचे तात्पर्य एकच आहे की, स्वामी ज्या भावाने आणि आचरणाने संतुष्ट होत असेल, तसा भाव ठेवून त्यांच्या आज्ञेनुसार आचरण करणे म्हणजेच भक्ती.

श्रीमद्भागवतात प्रह्लादाच्या नवविधा भक्तीविषयीचे त्याचे स्वरूप, विधी, प्रयोजन, हेतू, फळ आणि उदाहरणाचे दिग्दर्शन केले आहे. वरील नवविधा भक्तीमधून एकीचे जरी चांगल्या प्रकारे अनुष्ठान केले, तर परमपद प्राप्त होते. मग नऊंचे नीट अनुष्ठान करणाऱ्याविषयी तर बोलायलाच नको.



# श्रवण

भगवंतांच्या प्रेमळ भक्तांनी सांगितलेल्या भगवंतांच्या, नाम, रूप, गुण, प्रभाव, लीला, तत्त्व आणि रहस्याच्या अमृततुल्य कथांचे श्रवण श्रद्धेने आणि प्रेमाने करीत असताना, जसे वीणा ऐकून हरिण मुग्ध होते तसे प्रेममुग्ध होणे; हे श्रवण भक्तीचेच रूप आहे.

वरील श्रवणभक्तीच्या प्राप्तीसाठी श्रद्धा आणि प्रेमाने महापुरुषांना साष्टांग दंडवत, त्यांची सेवा आणि निष्कपटपणे त्यांना प्रश्न विचारून त्यांनी सांगितल्याप्रमाणे आचरण करण्याचा सदैव निरलस प्रयत्न करावयास हवा. श्रवण-भक्ती साधण्यासाठी हे करावयास हवे. श्रीमद्भगवद्गीतेत भगवंतानी म्हटले आहे -

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः॥**

(४/३४)

"हे अर्जुना ! श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ आचार्यांपाशी जाऊन त्यांना मन:पूर्वक दण्डवत प्रणाम करून त्यांची सेवा केल्यामुळे आणि निष्कपटपणे प्रश्न विचारल्यामुळे परमात्मतत्त्व उत्तम तऱ्हेने जाणणारे ते ज्ञानी महात्मे

तुला त्या तत्त्वज्ञानाचा उपदेश करतील. अशा रीतीने ते तू जाणून घे.''

महापुरुषांनी वर्णन केलेल्या वरील श्रवण भक्तीला प्राप्त करून प्रभूच्या ठिकाणी अनन्य प्रेम जडण्यासाठी प्रभुभक्तांमध्ये त्याचा प्रचार करणे, हे त्याचे प्रयोजन आहे.

ही श्रवण-भक्ती महापुरुषांच्या सत्संगाशिवाय प्राप्त होणे कठीण आहे. गोस्वामी तुलसीदासांनीसुद्धा म्हटले आहे -

**बिनु सतसंग न हरि कथा तेहि बिनु मोह न भाग ।**
**मोह गएँ बिनु राम पद होइ न दृढ़ अनुराग ।।**

''सत्संगाशिवाय हरिकथा नाही. हरिकथेशिवाय संसाराविषयीचा मोह जात नाही. आणि मोह गेल्याशिवाय प्रभू रामांच्या चरणी दृढ प्रेम जडत नाही.''

परंतु महापुरुषांच्या सत्संगाच्या अभावी उच्चश्रेणीच्या साधकांचा संग आणि महापुरुषविरचित ग्रंथांचे अवलोकन करणेसुद्धा सत्संगासमानच आहे.

सत्संग न झाल्यास विषयांचा संग स्वाभाविकपणेच होतो. त्यामुळे माणसाचे पतन होते. आणि सत्संगाने प्रत्यक्ष मोठा लाभ होतो. कारण माणसाला जसा संग होतो, तसा त्याच्यावर त्याचा प्रभाव पडतो. आणि श्रवण-भक्तीसुद्धा सत्संगानेच मिळते. कारण सत्संगच श्रवण-भक्तीचा हेतू आहे. तसेच सत्पुरुषांचे दर्शन, भाषण, स्पर्श, चिन्तन आणि संगाने पापी पुरुषही परम पवित्र होतो. महापुरुषांच्या कृपेशिवाय कोणालाही परमपद मिळू शकत नाही.

श्रीमद्भागवतात राजा रहूगणाला महात्मा जडभरत म्हणतात -

**रहूगणैतत्तपसा न याति न चेज्यया निर्वपणाद् गृहाद्वा ।**
**न च्छन्दसा नैव जलाग्निसूर्यैर्विना महत्पादरजोऽभिषेकम् ।।**

(५/१२/१२)

''हे रहूगण ! महापुरुषांच्या चरणधुळीत स्नान केल्याशिवाय केवळ तप, यज्ञ, दान, गृहस्थ-धर्मपालन आणि वेदाध्ययनाने आणि जल, अग्नी व सूर्याच्या उपासनेने तो परमतत्त्वाचे ज्ञान प्राप्त करू शकत नाही.''

म्हणून असे सिद्ध होते की, सगळ्या कार्याची सिद्धी महापुरुषांच्या संगानेच होते. श्रीमद्भागवतात भगवान उद्धवाला म्हणतात -

**यथोपश्रयमाणस्य भगवन्तं विभावसुम्।**
**शीतं भयं तमोऽप्येति साधून् संसेवतस्तथा।।**
**अन्नं हि प्राणिनां प्राण आर्तानां शरणं त्वहम्।**
**धर्मो वित्तं नृणां प्रेत्य सन्तोऽर्वाग् बिभ्यतोऽरणम्।।**

(११/२६/३१,३३)

"हे उद्धवा ! ज्याप्रमाणे भगवान अग्निदेवाचा आश्रय घेतल्याने शीत, भय आणि अन्धकाराचा नाश होतो, त्याप्रमाणे संत-महात्म्यांच्या संगतीने संपूर्ण पापरूपी शीत, जन्म-मृत्युरूपी भय आणि अज्ञानरूपी अन्धकाराचा नाश होतो.

जसे प्राणिमात्रांचे जीवन अन्न आहे आणि दुःखी पुरुषांचा आश्रय मी आहे, तसेच मृत्यूनंतर माणसाला धर्म हेच धन आहे, तसेच जन्म-मृत्यूच्या भयाने व्याकुळ झालेल्या पुरुषासाठी संत-महात्मा परम आश्रयस्थान आहे."

**न रोधयति मां योगो न सांख्यं धर्म एव च।**
**न स्वाध्यायस्तपस्त्यागो नेष्टापूर्तं न दक्षिणा।।**
**व्रतानि यज्ञश्छन्दांसि तीर्थानि नियमा यमाः।**
**यथावरुन्धे सत्सङ्गः सर्वसङ्गापहो हि माम्।।**

(११/१२/१-२)

"जसे सगळ्या आसक्तींचा नाश करणाऱ्या सत्पुरुषांचा संग मला प्रेमपाशात बांधू शकतो, तसे योग, सांख्य, धर्मपालन, स्वाध्याय, तप, त्याग, यज्ञ, विहिरी-तलावांचे निर्माण, दान, तसेच व्रत, पूजा, वेदाध्ययन, तीर्थाटन, यम-नियमांचे पालन वगैरे मला बांधू शकत नाहीत. म्हणजेच त्यांच्यामुळे मी वश होत नाही."

महापुरुषांचा संग दुर्लभ, अगम्य आणि अमोघ आहे. म्हणून भगवत्

प्राप्तीच्या इच्छुक पुरुषांनी त्या सत्पुरुषांचा संग अवश्य करावयास हवा. देवर्षी नारदाने म्हटले आहे -

**'महत्सङ्गस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च।'**

**(ना. सूत्र ३९)**

'महापुरुषांचा सङ्ग दुर्लभ, अगम्य आणि अमोघ आहे.' म्हणून—

**'तदेव साध्यताम्, तदेव साध्यताम्।'**

**(ना. सूत्र ४२)**

'त्या सत्संगाचीच साधना करा - सत्संगाचीच साधना करा अर्थात संत-महापुरुषांचा संग, सेवा आणि आज्ञेचे पालन करा.'

सत्पुरुषांकडून प्राप्त झालेल्या केवळ श्रवण-भक्तीनेसुद्धा मनुष्य परमपद प्राप्त करू शकतो, हे त्याचे फळ आहे. भगवंताने श्रीमद्भगवद्गीतेत म्हटले आहे—

**अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते।**
**तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः॥**

(१३/२५)

"दुसरे जे मंद बुद्धीचे पुरुष आहेत, त्यांना स्वतःला ज्ञान नसून तत्त्व जाणणाऱ्या पुरुषांचे ऐकून त्याप्रमाणे जे उपासना करतात, असे श्रवणपरायण पुरुषही मृत्युरूपी भवसागर निःशंकपणे तरून जातात."

नारदाने श्रीमद्भागवतमाहात्म्यात सनकादिकांना सांगितले आहे—

**श्रवणं सर्वधर्मेभ्यो वरं मन्ये तपोधनाः।**
**वैकुण्ठस्थो यतः कृष्णः श्रवणाद् यस्य लभ्यते॥**

(६/७६)

"हे तपोधन हो! मी भगवंताच्या गुणानुवादांचे श्रवण करणे सर्व धर्मांहून श्रेष्ठ समजतो. कारण भगवंताचे गुणानुवाद ऐकल्याने वैकुंठवासी भगवंताची प्राप्ती होते."

केवळ श्रवण-भक्तीने भगवंताची प्राप्ती होते. यासाठी शास्त्रात

बरीच उदाहरणे मिळतात. तसेच इतिहासात आणि पुराणातही खूप उदाहरणे मिळतात. जसे भागवत ऐकल्यामुळे परीक्षित राजाला परमपदाची प्राप्ती झाली. श्रीमद्‌भागवतमाहात्म्यात लिहिले आहे—

**असारे संसारे विषयविषसङ्गाकुलधियः**
**क्षणार्धं क्षेमार्थं पिबत शुकगाथातुलसुधाम्।**
**किमर्थं व्यर्थं भो व्रजत कुपथे कुत्सितकथे**
**परीक्षित्साक्षी यच्छ्रवणगतमुक्त्युक्तिकथने॥**

(६/१००)

"हे विषयरूपी विषाच्या संसर्गाने व्याकुळबुद्धी झालेल्या पुरुषांनो! कुजकट गोष्टींच्या कुमार्गात उगीच भटकत आहात. या असार संसारात कल्याणासाठी कमीतकमी क्षणार्ध तरी शुकदेवांच्या मुखातून सांगितलेल्या भागवत कथारूप अनुपम अमृताचे पान करा. श्रवणाने मुक्ती मिळते, यासाठी पुरावा म्हणून परीक्षित राजा आहे."

धुन्धुकारीसारखा पापीसुद्धा केवळ ईश्वराचा गुणानुवाद ऐकल्यामुळे तरून गेला. आणि शौनक वगैरे अनेक ऋषीसुद्धा इतिहास आणि पुराणश्रवणात आपला काळ व्यतीत करीत असत. त्यांना कधीच तृप्ती होत नसे.

या मनुष्यजीवनासाठी याहून अधिक आनंददायी असा दुसरा श्रवणीय विषय नाही आणि हे महापुरुषांच्या सत्संगानेच प्राप्त होते. म्हणून महापुरुषांच्या संगतीसारखा आनंददायी आणि लाभदायी असा दुसरा कुठलाही पदार्थ मनुष्यासाठी या जगात नाही. श्रीमद्भागवतात म्हटलेआहे.

**तुलयाम लवेनापि न स्वर्गं नापुनर्भवम्।**
**भगवत्सङ्गिसङ्गस्य मर्त्यानां किमुताशिषः॥**

(१/१८/१३)

"भगवत्सङ्गी म्हणजेच सदा भगवंतासोबत राहाणाऱ्या उत्कट भक्ती असलेल्या भक्तांच्या क्षणभराच्या संगतीची बरोबरी स्वर्ग किंवा मोक्षाबरोबरही होऊ शकत नाही, मग माणसांच्या इच्छित पदार्थांची गोष्टच कशाला?"

म्हणून आपले सगळे आयुष्य महापुरुषांच्या संगतीत घालवून भगवंताचे नाव, रूप, गुण, प्रेम, प्रभाव, लीला, धाम, रहस्य आणि तत्त्वाच्या अमृता समान गोष्टी सतत ऐकावयास हव्यात आणि त्या ऐकता-ऐकता प्रेमानन्दात बुडून जाऊन मनुष्यजीवन सफळ करावयास हवे.



# कीर्तन

भगवंतांचे नाव, रूप, गुण, प्रभाव, चरित्र, तत्त्व आणि रहस्याचा श्रद्धेने आणि प्रेमाने उच्चार करीत करीत शरीरात रोमांच, गहिवर, अश्रुपात, हृदयाची प्रसन्नता, मुग्धता आदि आविर्भाव होणे, कीर्तन, भक्तीचे स्वरूप आहे.

कथा,व्याख्यान वगैरे द्वारा भक्तांसमोर भगवंताच्या प्रेमप्रभावाचे कथन करणे, एकांतात किंवा समूहात भगवंत प्रत्यक्ष समोर हजर आहेत, असे समजून त्यांच्या नावाचा जप करणे आणि सस्वर कीर्तन करणे, भगवंताचे गुण, प्रभाव आणि चरित्र वगैरेंचे श्रद्धेने आणि प्रेमाने, हळू-हळू किंवा उच्च स्वरात, उभे राहून किंवा बसून वाद्यवृंदासहित किंवा विरहित नामस्मरण करणे, तसेच दिव्य स्तोत्र आणि पदांद्वारा भगवंताची स्तुती करणे, प्रार्थना करणे इत्यादि कीर्तन-भक्ती करण्याचाच एक प्रकार आहे. परंतु या सगळ्या क्रिया नामाच्या दहा अपराधांना वगळून* दंभरहित शुद्ध भावनेने, स्वाभाविकतेने व्हावयास हव्यात.

वरील कीर्तनभक्ती प्राप्त करून सर्वांना भगवंताच्या ठिकाणी अनन्य

* सन्निन्दासति नामवैभवकथा श्रीशेशयोर्भेदधी-
रश्रद्धा श्रुतिशास्त्रदैशिकगिरां नाम्न्यर्थवादभ्रमः।
नामास्तीति निषिद्धवृत्तिविहितत्यागो हि धर्मान्तरैः
साम्यं नाम्नि जपे शिवस्य च हरेर्नामापराधा दश॥

'सत्पुरुषांची निंदा, श्रद्धा नसलेल्यांना नाममहिमा सांगणे, विष्णू आणि शिव यांच्यात भेदबुद्धी, वेद, शास्त्र आणि गुरुवाणीवर अविश्वास, हरिनामात अर्थवादाचा भ्रम अर्थात केवळ स्तुतीच आहे असे समजणे, नामाच्या बळावर विहिताचा त्याग आणि निषिद्ध आचरण, दुसऱ्या धर्मांबरोबर नामाची तुलना

प्रेम जडून त्याची प्राप्ती व्हावी, या उद्देशाने कीर्तन करणे, हे याचे प्रयोजन आहे.

कीर्तन-भक्तीसुद्धा ईश्वर आणि महापुरुषांच्या कृपेमुळेच प्राप्त होते. म्हणून यासाठी त्यांची कृपा असावयास हवी. कारण भगवंतांच्या भक्तांद्वारा भगवंतांचे प्रेम, प्रभाव, तत्त्व आणि रहस्याच्या गोष्टी ऐकून तसेच शास्त्रपठन केल्याने भगवंतांच्या ठिकाणी श्रद्धा जडते. आणि मग मनुष्य वरील कीर्तनभक्ती मिळवू शकतो. म्हणून भगवंत आणि त्यांच्या भक्तांची कृपा मिळविण्यासाठी त्यांच्या आज्ञेचे पालन करावयास हवे.

अशा प्रकारच्या केवळ कीर्तनभक्तीनेसुद्धा मनुष्य परमात्म्याच्या कृपेमुळे त्याच्यावर उत्कट प्रेम करून त्याला प्राप्त करू शकतो. गीतेत भगवंतांनी म्हटले आहे -

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्।**
**साधुरेव स मन्तव्य: सम्यग्व्यवसितो हि स:॥**
**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति।**
**कौन्तेय प्रति जानीहि न मे भक्त: प्रणश्यति॥**

(९/३०-३१)

"जरी कोणी अतिशय दुराचारीसुद्धा अनन्य भावाने माझा भक्त होऊन माझे भजन करीन, तर त्याला साधू मानणे योग्य आहे. कारण तो दृढनिश्चयी आहे. अर्थात त्याने दृढनिश्चय केला आहे की, परमेश्वराच्या भक्तीशिवाय दुसरे काहीही नाही. म्हणून तो लौकरच धर्मात्मा होतो आणि शाश्वत अशी परम शांती प्राप्त करतो. हे अर्जुना ! तू निश्चयपूर्वक सत्य समज की माझा भक्त नष्ट होत नाही."

इतकेच नाही, तर या कीर्तनभक्तीचा प्रचारक भगवंताला सर्वाधिक प्रिय आहे. भगवंताने स्वत: गीतेत म्हटले आहे -

---

म्हणजे शास्त्रविहित कर्मांबरोबर नामाची तुलना - हे सर्व भगवान श्वि आणि विष्णूच्या नामजपातील दहा अपराध आहेत.'

**य इमं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः॥**
**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः।**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि॥**

(१८/६८-६९)

"जो पुरुष माझ्यावर अनन्य प्रेम करून हे परम रहस्ययुक्त गीताशास्त्र माझ्या भक्तांना सांगेल अर्थात निष्काम भावनेने प्रेमाने माझ्या भक्तांना शिकवेल आणि अर्थ सांगून त्याचा प्रचार करून लोकांच्या हृदयात धारण करवील, तो मला प्राप्त करील, यात तिळमात्र शंका नाही. असे प्रिय कार्य करणारा सोडून मला दुसरा कोणी प्रिय नाही. आणि पुढेही नसेल". हेच या कीर्तनभक्तीचे फळ आहे.

भागवत आणि रामायण वगैरे सर्व प्रकारच्या भक्तिग्रंथांमध्ये भगवंताच्या केवळ नामस्मरणाने आणि गुणकीर्तनाने सर्व पापांचा नाश आणि भगवत्प्राप्ती सांगितली आहे. श्रीमद्‌भागवतात म्हटले आहे -

**ब्रह्महा पितृहा गोघ्नो मातृहाऽऽचार्यहाघवान्।**
**श्वादः पुल्कसको वापि शुद्ध्येरन् यस्य कीर्तनात्॥**

(६/१३/८)

"ब्राह्मणघाती, पितृघाती, गोघाती, मातृघाती, गुरुघाती - असे पापी तसेच चाण्डाळ आणि म्लेंछ जातीचेसुद्धा कीर्तनाने शुद्ध होतात."

**सङ्कीर्त्यमानो भगवाननन्तः श्रुतानुभावो व्यसनं हि पुंसाम्।**
**प्रविश्य चित्तं विधुनोत्यशेषं यथा तमोऽर्कोऽभ्रमिवातिवातः॥**

(श्रीमद्भाग. १२/१२/४७)

"ज्याप्रमाणे सूर्य अन्धकाराला, प्रचंड वायू ढगांना छिन्न-भिन्न करतो, तशाच प्रकारे ज्यांचा प्रभाव विख्यात आहे, असे अनन्त भगवान मानव-हृदयात प्रवेश करून सगळ्या पापांचा निःसंदेह समूळ नाश करतात." तसेच -

**आपन्नः संसृतिं घोरां यन्नाम विवशो गृणन्।**
**ततः सद्यो विमुच्येत यद्बिभेति स्वयं भयम्॥**

**(श्रीमद्भाग. १/१/१४)**

"भयंकर अशा भवसागरात सापडलेल्या मनुष्याने, ज्या परमात्म्याला भयही भिते, त्या परमात्म्याच्या नावाचे व्याकुळ होऊन जरी उच्चारण केले, तरी लगेच तो भव-बंधनातून मुक्त होतो.'

**कलेर्दोषनिधे राजन्नस्ति ह्येको महान् गुणः।**
**कीर्तनादेव कृष्णस्य मुक्तसङ्गः परं व्रजेत्॥**

**(श्रीमद्भाग. १२/३/५१)**

" हे राजन ! कलियुग हा जरी वाईट गोष्टींचा खजिना असला, तरी त्याचा हा एक मोठा गुण आहे की, भगवान श्रीकृष्णाच्या कीर्तनाने मनुष्य आसक्तिरहित होऊन परमात्म्याला प्राप्त करतो."

**इत्थं हरेर्भगवतो रुचिरावतार-**
**वीर्याणि बालचरितानि च शन्तमानि।**
**अन्यत्र चेह च श्रुतानि गृणन् मनुष्यो**
**भक्तिं परां परमहंसगतौ लभेत॥**

**(श्रीमद्भाग. ११/३१/२८)**

"अशा प्रकारे या भागवतात किंवा दुसऱ्या शास्त्रात वर्णिलेल्या भगवान कृष्णाच्या सुंदर अवतारांचे, पराक्रमांचे आणि अतिशय मंगलमय बालचरित्राचे वर्णन करताना मनुष्य परमहंसांच्या गतिस्वरूप भगवंतांच्या परा भक्तीला प्राप्त करतो."

**अहो बत श्वपचोऽतो गरीयान् यज्जिह्वाग्रे वर्तते नाम तुभ्यम्।**
**तेपुस्तपस्ते जुहुवुः सस्नुरार्या ब्रह्मानूचुर्नाम गृणन्ति ये ते॥**

**(श्रीमद्भाग. ३/३३/७)**

"अहो आश्चर्य आहे की, ज्याच्या जिभेवर तुमचे पवित्र नाव असते, तो चाण्डाळही श्रेष्ठ आहे; कारण जो तुमच्या नावाचे कीर्तन करतो, त्या

श्रेष्ठ पुरुषांनी तप, यज्ञ, तीर्थस्नान आणि वेदांचे अध्ययन वगैरे सगळे केले असे होते.''

रामचरितमानसात गोस्वामी तुलसीदासांनीसुद्धा नाम-जपाचा महिमा वर्णिलेला आहे.

**नामु सप्रेम जपत अनयासा । भगत होहिं मुद मंगल बासा ॥**
**नामु जपत प्रभु कीन्ह प्रसादू । भगत सिरोमनि भे प्रहलादू ॥**
**सुमिरि पवनसुत पावन नामू । अपने बस करि राखे रामू ॥**
**चहुँ जुग तीनि काल तिहुँ लोका । भए नाम जपि जीव बिसोका ॥**
**कहौं कहाँ लागी नाम बड़ाई । रामु न सकहिं नाम गुन गाई ॥**

''भक्तगण प्रेमाने नामजप करीत करीत सहजच आनन्द व कल्याणाचे घर बनतात. नामजपामुळे प्रभूंनी कृपा केली. त्यामुळे प्रह्लाद भक्तशिरोमणी झाले. हनुमंतांनी पवित्र प्रभुनामाचे स्मरण करून श्रीरामांना आपल्या आधीन करून घेतले. चारही युगांत, तिन्ही काळांत आणि तिन्ही लोकांत असणारे लोक नामजपाने शोकरहित झाले. नाममहिमा मी कुठवर वर्णन करू. प्रत्यक्ष प्रभू रामचंद्रसुद्धा नामाचा महिमा वर्णन करू शकत नाहीत.''

महर्षी पतंजलीही म्हणतात -

**तस्य वाचक: प्रणव: ।** (योग. १/२७)

''त्या परमात्म्याचे नाव ओंकार आहे.''

**'तज्जपस्तदर्थभावनम्'** (योग. १/२८)

''त्या परमात्म्याच्या नावाचा जप आणि त्याच्या स्वरूपाचे चिंतन करावे.''

**तत: प्रत्यक्चेतनाधिगमोऽप्यन्तरायाभावश्च ।**
(योग. १/२९)

''वरील साधनाने सगळ्या विघ्नांचा, संकटांचा नाश होतो आणि परमात्म्याची प्राप्ती होते.'' नारद पुराणातही सांगितले आहे -

**हरेर्नाम हरेर्नाम हरेर्नामैव केवलम् ।**
**कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा ॥**
(१/४१/११५)

''कलियुगात केवळ श्रीहरीचे नावच कल्याण साधण्याचे मोठ्यात मोठे साधन आहे. त्याशिवाय दुसरा कोणताच उपाय नाही.'' अशा प्रकारे शास्त्रात दुसरी अनेक उदाहरणे मिळतात.

या कीर्तनभक्तीमुळे पूर्वी अनेकजण तरले. इतिहास, पुराण आणि रामायणात त्याची अनेक उदाहरणे मिळतात.

भगवंताचे नाव आणि गुणकीर्तनाच्या प्रतापाने पूर्वीच्या काळी, नारद, वाल्मीकी, शुकदेव वगैरे तसेच अर्वाचीन काळात गौराङ्ग महाप्रभू, तुलसीदास, सूरदास, नानक, तुकाराम, नरसी, मीराबाई वगैरे अनेक भक्तांना परमपद प्राप्त झाले. त्यांच्या जीवनाचा इतिहास प्रसिद्ध आहे. परम भक्तांच्या गोष्टी जाऊ देत. जे महापापी होते, ते सुद्धा तरले. गोस्वामी तुलसीदासांनी म्हटले आहे -

**अपतु अजामिलु गजु गनिकाऊ। भए मुकुत हरि नाम प्रभाऊ॥**

''नीच असे अजामिळ, गजेन्द्र आणि वेश्यासुद्धा हरिनामाच्या प्रभावाने मुक्त झाले.''

जसे मेघाला बघून चातक पाण्यासाठी पी-पी करतो. तसे भगवंतावर प्रेम जडण्यासाठी आणि त्याच्या प्राप्तीसाठी भगवंताचे नाम आणि त्याचे गुणकीर्तन सदैव तत्पर होऊन देहात प्राण असे पर्यंत. घ्यावयास हवे.



# स्मरण

भगवंताचे नाम, रूप, गुण, प्रभाव, लीला तत्त्व आणि रहस्यमय अमृतासमान कथांचे जे श्रद्धेने आणि प्रेमाने श्रवण आणि पठण केलेले असेल, त्याचे मनन करणे आणि असे मनन करता-करता देहाची शुद्ध विसरून भगवंताच्या स्वरूपात ध्रुवाप्रमाणे तल्लीन होऊन जाणे, हे स्मरण-भक्तीचे स्वरूप आहे.

शक्यतोवर एकान्त आणि पवित्र जागी सुखाने साध्या आसनात बसून इन्द्रियांना विषयरहित करून कामना आणि संकल्पांचा त्याग करून

प्रशांत आणि वैराग्यपूर्ण चित्ताने किंवा उठता-बसता, हिंडता-फिरता, खाता-पिता, झोपता-उठता सगळी कामे करतानाही स्वाभाविक शुद्ध आणि सरळ भावाने भगवंतांच्या सगुण-निर्गुण, साकार* निराकाराचे तत्त्व समजून गुण आणि प्रभावासहित भगवंतांच्या स्वरूपाचे चिन्तन करणे, भगवंतांच्या नावाचे मन:पूर्वक स्मरण करणे, भगवंतांच्या लीलेची आठवण करून मुग्ध होणे, भगवंतांचे तत्त्व आणि रहस्य समजून त्याच्या गुण-प्रभावाचे चिंतन करणे आणि दिव्य स्तोत्र आणि पदांनी मनापासून स्तुती आणि प्रार्थना करणे अशा प्रकारे स्मरणाचे अनेक प्रकार शास्त्रात सांगितलेले आहेत.

---

* श्रीमद्भागवतात सगुण-साकाराचे ध्यान-करण्याचा हा एक प्रकार आहे.

**समं प्रशान्तं सुमुखं दीर्घचारुचतुर्भुजम्।**
**सुचारुसुन्दरग्रीवं सुकपोलं शुचिस्मितम्॥**
**समानकर्णविन्यस्तस्फुरन्मकरकुण्डलम् ।**
**हेमाम्बरं घनश्यामं श्रीवत्सश्रीनिकेतनम् ॥**
**शङ्खचक्रगदापद्मवनमालाविभूषितम् ।**
**नूपुरैर्विलसत्पादं कौस्तुभप्रभया युतम्॥**
**द्युमत्किरीटकटककटिसूत्राङ्गदायुतम्**
**सर्वाङ्गसुन्दरं हृद्यं प्रसादसुमुखेक्षणम्।**
**सुकुमारमभिध्यायेत् सर्वाङ्गेषु मनो दधत्॥**

(११/१४/३८-४१)

जो सम आहे, प्रशान्त आहे, ज्याचे मुख सुंदर आहे, ज्याला चार सुंदर भुजा आहेत, ज्याचा कंठ अति सुंदर आहे, जो सुंदर कपोलधारी आहे, ज्याचे हास्य उज्ज्वल आहे, ज्याने कानात देदीप्यमान मकराकृती कुण्डले धारण केली आहेत, ज्याचा वर्ण मेघासमान श्याम आहे, जो पीताम्बरधारी आहे, ज्याच्या हृदयात श्रीवत्स आणि लक्ष्मीचे चिन्ह आहे, जो शंख, चक्र, गदा, पद्म आणि वनमालांनी विभूषित आहे, ज्याचे चरण नूपुरांनी सुशोभित आहेत. जो कौस्तुभमण्याच्या तेजाने युक्त आहे, जो देदीप्यमान किरीट, कड़े (कंकण), मेखला आणि बाजूबंदांनी युक्त आहे, जो सर्वांगसुन्दर आहे, जो मनोहर आहे, ज्याचे मुख आणि दृष्टी कृपाळू आहे, अशा भगवंतांच्या सुकुमार अंगाचे नेटाने मन लावून ध्यान करावे.

भगवंतांवर अनन्य प्रेम जडून त्याची प्राप्ती होणे हा त्याचा उद्देश आहे.

प्रेमळ भक्तांद्वारा नाम, रूप, गुण, प्रभाव वगैरेंच्या अमृतासमान कथांचे श्रद्धेने आणि प्रेमाने श्रवण करणे, भगवंतांविषयीच्या धार्मिक पुस्तकांचे पठन-पाठन करणे, भगवंतांचे नामस्मरण आणि कीर्तन करणे, भगवंताची पदे आणि स्तोत्रे किंवा कुठल्याही प्रकाराने ध्यानासाठी करुणा भावाने स्तुती करणे, प्रार्थना करणे आणि भगवंत व महापुरुषांची आज्ञा पाळणे वगैरे स्मरण-भक्ती प्राप्त करण्याचे उपाय आहेत.

वर सांगितलेल्या केवळ स्मरण-भक्तीने सुद्धा सगळी पापे, संकटे, अवगुण आणि दुःखे दूर होतात. भगवंताच्या स्मरणाद्वारे मनुष्य जे हवे ते प्राप्त करू शकतो. भगवंताची प्राप्तीरूपी परमशांती या मुळे लौकरच आणि सहजतेने प्राप्त होते. श्रुती, स्मृती, इतिहास, पुराणे, संत, महात्मे सर्वांनी एका स्वरात भगवत्-स्मरणाचा महिमा वर्णिला आहे. कठोपनिषदात सांगितले आहे -

**एतद्ध्येवाक्षरं ब्रह्म एतद्ध्येवाक्षरं परम्।**
**एतद्ध्येवाक्षरं ज्ञात्वा यो यदिच्छति तस्य तत्॥**

(१/२/१६)

ॐकार हे अक्षर ब्रह्मच आहे, हेच परब्रह्म आहे. या ॐकाराला ओळखून त्याची उपासना केल्याने माणसाला जे हवे ते मिळते.

सन्ध्योपासनविधीच्या प्रारंभी लिहिले आहे -

**अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोऽपि वा।**
**यः स्मरेत् पुण्डरीकाक्षं स बाह्याभ्यन्तरः शुचिः॥**

'अपवित्र किंवा पवित्र कुठल्याही अवस्थेतील पुरुषाने भगवान पुण्डरीकाक्षाचे स्मरण केले, तर तो अंतर्बाह्य शुद्ध होतो.' श्रीमद्भगवद्गीतेत भगवंतांनी म्हटले आहे -

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति॥**

(६/३०)

"जो पुरुष सर्व भूतांच्याठायी मज वासुदेवाचेच स्वरूप पाहातो आणि सर्व भूतांना मज वासुदेवाच्या अंतर्गतच पाहातो, त्याच्यासाठी मी अदृश्य नसतो आणि तो माझ्यासाठी अदृश्य नसतो."

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥**
**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन्॥**

(गीता ८/७-८)

"म्हणून हे अर्जुना ! तू सतत माझे स्मरण कर आणि युद्धही कर. अशा प्रकारे मला अर्पण केलेल्या मन-बुद्धीने युक्त होण्याने निःसंशय तू मलाच प्राप्त होशील. हे पार्था ! असा नियम आहे की, परमेश्वराच्या ध्यानाच्या अभ्यासरूप योगाने युक्त असून दुसऱ्या कोठेही चित्त नसलेल्या पुरुषाने निरन्तर चिन्तन केले, तर तो परम प्रकाशस्वरूप दिव्य पुरुषाला म्हणजेच परमेश्वराला प्राप्त करतो."

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः॥**

(गीता ८/१४)

"हे अर्जुना ! जो पुरुष माझ्या ठिकाणी अनन्य निष्ठा ठेवून सतत मज पुरुषोत्तमाचे स्मरण करतो, त्या नित्य-निरन्तर माझ्यात रमणाऱ्या योग्यासाठी मी सुलभ आहे. अर्थात त्याला मी सहज प्राप्त होतो."

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥**

(गीता ९/२२)

"जो अनन्य प्रेमळ भक्त मज परमेश्वराचे निरन्तर चिन्तन करीत निष्काम भावनेने माझे भजन करतो, त्या नित्य निरन्तर माझे चिन्तन करणाऱ्या पुरुषांचा योगक्षेम मी स्वतः चालवतो."

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते॥**

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्।**
**भवामि नचिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम्।।**
**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय।**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः।।**

(गीता १२/६-८)

''पण जो माझ्यात तन्मय झालेला भक्त संपूर्ण कर्मे मला अर्पण करून मज सगुणरूप परमेश्वरालाच तेलाच्या धारेप्रमाणे अनन्य भक्ति-भावाने निरन्तर चिन्तन करीत भजतो, हे अर्जुना ! त्या माझ्यात चित्त असणाऱ्या प्रेमळ भक्ताचा मी शीघ्र मृत्युरूपी भवसागरातून उद्धार करतो. म्हणून हे अर्जुना ! माझ्या ठायी तू चित्त ठेव आणि बुद्धीसुद्धा माझ्या ठायीच ठेव. म्हणजे मग तू माझ्यातच निवास करशील अर्थात मला प्राप्त होशील, यात तिळमात्रही संशय नाही.'

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव।।**
**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि।**

(गीता १८ /५७-५८)

'हे अर्जुना ! तू मनःपूर्वक सर्व कर्मे मला अर्पण करून आणि समत्वबुद्धिरूप निष्काम कर्मयोग आचरून माझ्या ठायी सतत चित्त असलेला हो. वरीलप्रमाणे माझ्या ठायी चित्त असणारा होऊन माझ्या कृपेने सगळ्या संकटांतून अनायासे पार होशील.'

श्रीमद्भागवतात म्हटले आहे -

**कीटः पेशस्कृता रुद्धः कुड्यायां तमनुस्मरन्।**
**संरम्भभययोगेन विन्दते तत्सरूपताम्।।**
**एवं कृष्णे भगवति मायामनुज ईश्वरे।**
**वैरेण पूतपाप्मानस्तमापुरनुचिन्तया।।**
**कामाद् द्वेषाद्भयात्स्नेहाद्यथा भक्त्येश्वरे मनः।**
**आवेश्य तदघं हित्वा बहवस्तद्गतिं गताः।।**

(श्रीमद्भा. ७/१/२७-२९)

''जसे भिंतीवर कुंभारीण माशीने मातीच्या घरात अडकविलेला किडा तिच्या क्रोधाच्या भयाने तिचे (भुंगा) स्मरण करता करता तिच्यासारखाच होतो. तसेच मायेने मनुष्यरूप धारण करणाऱ्या भगवान श्रीकृष्णाचे वैरभावानेसुद्धा वारंवार चिंतन केल्याने (रावणादिक) निष्पाप होऊन परमपदाला प्राप्त झाले. त्याचप्रमाणे काम, द्वेष, भय, स्नेह आणि भक्तीने ईश्वराच्या ठायी चित्त लावल्याने बरेचसे साधक पापरहित होऊन परमपदास पोचले.''

**शृण्वन् गृणन् संस्मरयंश्च चिन्तयन्**
**नामानि रूपाणि च मङ्गलानि ते।**
**क्रियासु यस्त्वच्चरणारविन्दयो-**
**राविष्टचेता न भवाय कल्पते॥**

**(श्रीमद्भाग. १०/२/३७)**

''जो पुरुष संपूर्ण क्रियाकलाप करताना आपल्या मंगलस्वरूपाचे आणि नामाचे श्रवण, कथन, स्मरण आणि चिन्तन करीत असताना आपल्या चरणारविन्दाच्या ठायी चित्त ठेवतो, तो पुन्हा जगात येत नाही. (जन्म-मृत्यूच्या फेऱ्यातून सुटतो.)''

**विषयान् ध्यायतश्चित्तं विषयेषु विषज्जते।**
**मामनुस्मरतश्चित्तं मय्येव प्रविलीयते॥**

**(श्रीमद्भाग.११/१४/२७)**

'विषय-चिन्तन करणाऱ्याचे मन नेहमी विषयासक्त असते. आणि माझे (परमेश्वराचे) सतत चिन्तन करणाऱ्याचे मन माझ्यातच रममाण होते.'

**अविस्मृतिः कृष्णपदारविन्दयोः**
**क्षिणोत्यभद्राणि शमं तनोति च।**
**सत्त्वस्य शुद्धिं परमात्मभक्तिं**
**ज्ञानं च विज्ञानविरागयुक्तम्॥**

**(श्रीमद्भाग. १२/१२/५४)**

''श्रीकृष्णचन्द्र महाराजांच्या चरणकमलांची स्मृती सगळ्या पापांचा

नाश करते आणि अंतःकरणाची शुद्धी भगवंतांच्या ठायी भक्ती, विज्ञानविरागसहित ज्ञान आणि शांती वाढविते.

श्रीविष्णुसहस्त्रनामाच्या सुरवातीला म्हटले आहे -

**यस्य स्मरणमात्रेण जन्मसंसारबन्धनात्।**
**विमुच्यते नमस्तस्मै विष्णवे प्रभविष्णवे।।**

ज्याच्या केवळ स्मरणाने मनुष्य जन्ममृत्युरूपी संसार बंधनातून मुक्त होतो, अशा जग उत्पन्न करणाऱ्या विष्णूला नमस्कार असो.

श्रीतुलसीकृत रामायणात सुतीक्ष्णाची स्मरण-भक्ती वाखाणण्या-जोगी आहे. सुतीक्ष्ण भगवंतांच्या प्रेमात मग्न होऊन मनातल्या मनात भगवंतांचे स्मरण करताना म्हणतो -

**सो परम प्रिय अति पातकी जिन्ह कबहुँ प्रभु सुमिरन कर्‍यौ।**
**ते आजु मैं निज नयन देखौं पूरि पुलकित हिय भर्‍यौ।।**
**जे पदसरोज अनेक मुनि करि ध्यान कबहुँक पावहीं।**
**ते राम श्रीरघुबंसमनि प्रभु प्रेम तें सुख पावहीं।।**

"जो कोणी अतिशय पातकीसुद्धा प्रभूचे स्मरण करतो, तो सुद्धा ज्या प्रभूला परम प्रिय होतो, त्या प्रभूला मी आज माझ्या डोळ्यांनी पाहिले आणि माझे अंतःकरण भरून आले. मी संपूर्ण रोमांचित झालो. ज्या चरणकमलांचे ध्यान करून अनेक मुनी केव्हा ना केव्हा त्यांची प्राप्ती करून घेतात, त्या श्रीरघुवंशरत्न श्रीराम प्रभूंचे प्रेम प्राप्त करून मी सुखी झालो."

पुढे पुढे तो ईश्वरचिन्तनात इतका मस्त झाला की, त्याला आपल्या तन-मनाची शुद्ध-देखील राहिली नाही.

**मुनि मग माझ अचल होइ बैसा। पुलक सरीर पनस फल जैसा।**

"ऋषी भक्तीमार्गामध्ये असे स्थिर होऊन बसले. त्यामुळे त्यांचे शरीर फणसासारखे रोमांचित झाले."

एवढेच नाही तर, भगवंताचे दर्शन घडल्यावरही त्याने हाच वर मागितला की, हे नाथ ! माझ्या हृदयात आपला सतत वास असो.

**अनुज जानकी सहित प्रभु चाप बान धर राम।**
**मम हिय गगन इंदु इव बसहु सदा निहकाम॥**

"धाकटे बंधू लक्ष्मण व जानकीसह चाप-बाणधारी प्रभू रामचंद्र आकाशात चंद्र असावा, तसे माझ्या निष्काम हृदयात नेहमी राहोत."

यावरून असे सिद्ध होते की, सुतीक्ष्णाला भगवंताचे ध्यान फार प्रिय होते. अशा प्रकारे देवाचे स्मरण करणाऱ्या अनेक भक्तांची नावे शास्त्रांत आहेत. पण सगळ्यांविषयी लिहीत बसलो, तर फार मोठी यादी होईल. म्हणून थोड्या भक्तांची नावे दिली आहेत. उदा. सनकादी, ध्रुव, भीष्म, कुन्ती आदि सर्व स्मरणभक्तीमुळेच परमपदाला पोचले. यांच्याशिवाय खालच्या जातीची भिल्लीण आणि जटायूसारख्या पक्ष्यालाही भगवंताच्या स्मरणाने परमगती मिळाली.

गुण, प्रभाव आणि प्रेमसहित भगवंताच्या स्वरूपाचे ध्यान करणे यासारखे लगेचच उद्धार करणारे दुसरे साधन नाही. बहुधा सगळ्या साधनांचे फळ भगवंताचे स्मरण आहे. म्हणून आपले जीवन वरील-प्रमाणे भगवद्भक्तीत व्यतीत होईल, असा प्रयत्न करावा. संत कबीराने म्हटले आहे -

**सुमिरनसों मन लाइये, जैसे दीप पतंग।**
**प्रान तजे छिन एकमें, जरत न मोड़ै अंग॥**
**सुमिरनसों मन लाइये, जैसे कीट भिरंग।**
**कबीर बिसारे आपको, होय जाय तेहि रंग॥**

"पतंग दिव्यावर झेप घेऊन एका क्षणात प्राण सोडतो, पण त्यापासून दूर होत नाही, तसे मन प्रभूच्या स्मरणात लावा. कबीर म्हणतात, जसा किडा कुंभारीणमाशीकडे पाहता पाहता स्वतःला विसरतो आणि तद्रूप होतो, तसे मन स्मरणात लावा."

भगवत्प्राप्तीची इच्छा असणाऱ्या साधकाने सदैव काम करीत असता, जसे कासव अण्ड्याकडे, गाय वासराकडे, कामुक स्त्रीकडे, लोभी धनाकडे, नटी आपले पायाकडे आणि वाहनचालक रस्तायाकडे लक्ष ठेवतात, त्याप्रमाणे परमेश्वराचे ध्यान ठेवावयास हवे.



# पाद-सेवन

सञ्चिन्तयेद्भगवतश्चरणारविन्दं
वज्राङ्कुशध्वजसरोरुहलाञ्छनाढ्यम् ।
उत्तुङ्गरक्तविलसन्नखचक्रवाल -
ज्योत्स्नाभिराहतमहद्धृदयान्धकारम् ॥
यच्छौचनिःसृतसरित्प्रवरोदकेन
तीर्थेन मूर्ध्न्यधिकृतेन शिवः शिवोऽभूत् ।
ध्यातुर्मनःशमलशैलनिसृष्टवज्रं
ध्यायेच्चिरं भगवतश्चरणारविन्दम् ॥
(श्रीमद्भाग.३/२८/२१-२२)

जो वज्र, अङ्कुश, ध्वजा आणि कमळ इत्यादि चिह्नांनी युक्त आहे, ज्यांच्या शोभायमान, रक्तवर्ण, उन्नत नखमंडळाची प्रभा भक्तांच्या हृदयातील अन्धकार पूर्णपणे नष्ट करते, अशा श्रीभगवन्तांच्या चरणकमलांचे मोठ्या प्रेमाने चिन्तन करावयास हवे.

ज्यांच्या चरणप्रक्षालनामुळे उत्पन्न झालेल्या पवित्र गंगाजळाला मस्तकावर धारण करून श्रीशिवाने शिवत्व प्राप्त केले आहे आणि जे ध्यान धरणाऱ्या पुरुषाच्या अन्तःकरणातील पापरूपी पहाडाच्या बाबतीत इन्द्राने सोडलेल्या वज्रासारखे आहेत अर्थात् ज्यांच्या ध्यानाने पापपुंज नष्ट होतात, त्या श्रीभगवंतांच्या चरणकमलांचे चिरकाल चिन्तन करावयास हवें.''

श्रीभगवंतांच्या दिव्य मङ्गलमय स्वरूपाची धातू वगैरेची मूर्ती, चित्र किंवा मानस मूर्तींच्या मनोहर चरणांचे श्रद्धापूर्वक दर्शन, चिन्तन, पूजन आणि सेवन करीत-करीत भगवत्प्रेमात तन्मय होऊन जाणे, यालाच 'पादसेवन' म्हणतात.

वारंवार अतृप्त नेत्रांनी भगवंतांच्या चरणारविन्दांचे दर्शन करणे, हाताने भगवंतांच्या चरणांचे पूजन आणि सेवन करणे आणि चरणोदक घेणे, मनःपूर्वक भगवंतांच्या चरणांचे पूजन-सेवन-चिन्तन करणे,

भगवंतांच्या चरणपादुकांचे हाताने पूजन आणि मनाने चिन्तन, सेवन करणे, भगवंतांचे चरणरज मस्तकावर धारण करणे, हृदयाशी धरणे, भगवंतांच्या चरणकमलांनी पवित्र झालेले शय्या, आसन वगैरेला तीर्थाहून अधिक समजून त्याचा आदर करणे, अयोध्या, चित्रकूट, वृंदावन, मथुरा इत्यादि जागी जिथे-जिथे भगवंतांचा अवतार किंवा प्राकट्य झाले किंवा जिथे-जिथे भगवंतांची चरणधूळ लागली, त्या त्या जागांना तीर्थस्थान समजून तिथल्या धुळीला भगवंतांची चरणधूळ समजून मस्तकावर धारण करणे, ज्या वस्तूला भगवंतांनी स्पर्श केला असेल, तिचा मनःपूर्वक आदर करणे आणि तिला मस्तकावर धारण करणे, तसेच गंगाजळाला भगवंताचे चरणोदक समजून त्याचे पूजन, सेवन करणे हे 'पाद-सेवन' भक्तीचे विभिन्न प्रकार आहेत.

ममता, अहंकार आणि अभिमान वगैरेंचा नाश होऊन प्रभुचरणी अनन्य प्रेमभाव जडण्यासाठीच 'पाद-सेवन' भक्ती केली जाते.

भगवंताच्या अनन्य भक्तांचा संग केल्याने भगवंतांच्या चरणसेवेचे तत्त्व, रहस्य आणि प्रभाव ऐकावयास मिळतो. मग श्रद्धा वाढून भक्ती प्राप्त होते.

केवळ या पाद-सेवनभक्तीने सुद्धा मनुष्यातील दुराचार, दुर्गुण आणि दुःख नष्ट होतात आणि मग भगवंतावर सहजतेने अतिशय श्रद्धा जडते, प्रेम बसते आणि त्याला परम शांती मिळते. मग त्याच्यासाठी काहीही दुर्लभ राहात नाही.

शास्त्रांनी आणि महात्म्यांनी पाद-सेवन-भक्तीचा महिमा गायिला आहे. श्रीशंकराचार्य म्हणतात की, भगवंतांच्या चरणकमलरूपी नौकेमुळेच भवसागर पार करता येईल.

**अपारसंसारसमुद्रमध्ये**
**सम्मज्जतो मे शरणं किमस्ति।**
**गुरो कृपालो कृपया वदैतद्**
**विश्वेशपादाम्बुजदीर्घनौका ॥**

''शिष्य - हे कृपाळू गुरुदेव! आपण कृपा करून हे सांगावे की, या अपार भवसागरात बुडणाऱ्या माझ्यासाठी कशाचा सहारा आहे? गुरू-भगवान विश्वेश्वराच्या चरणकमलरूपी जहाजाचा एकमात्र सहारा आहे.''

भगवंतांच्या चरणामृताचे पान करण्याने आणि त्याला मस्तकावर धारण केल्यानेही कल्याण होते. भगवान श्रीरामांचे चरणामृत प्राशन करून त्यांना नौकेतून पैलतीरावर घेऊन जाणाऱ्या नावाड्याचा महिमा सांगताना श्रीतुलसीदास म्हणतात -

**पद पखारि जलु पान करि आपु सहित परिवार।**
**पितर पारु करि प्रभुहि पुनि मुदित गयउ लेइ पार॥**

''गुह श्रीरामांचे पाय धुऊन परिवारासह ते पाणी प्याला. प्रथम त्या पुण्याईने त्याने आपल्या पितरांना भवसागरातून पार नेले आणि नंतर आनंदाने श्रीरामांना गंगेच्या पलीकडे नेले.''

सतत भगवंतांच्या चरणकमलांचे दर्शन आणि सेवन करून क्षणोक्षणी कसे आनंदित व्हावे, याचा आदर्श सीतामाई आहे. वनगमनाच्या वेळी तिने भगवंताला म्हटले -

**छिनु छिनु प्रभु पद कमल बिलोकी। रहिहउँ मुदित दिवस जिमि कोकी॥**
**मोहि मग चलत न होइहि हारी। छिनु छिनु चरन सरोज निहारी॥**
**पाय पखारि बैठि तरु छाहीं। करिहउँ बाउ मुदित मन माहीं॥**
**सम महि तृन तरुपल्लव डासी। पाय पलोटिहि सब निसि दासी॥**

''ज्याप्रमाणे चक्रवाकी दिवसा आनंदात राहते, त्याप्रमाणे क्षणोक्षणी प्रभूंचे चरण-कमल पाहात मी आनंदात राहीन. क्षणोक्षणी आपले चरणकमल पाहात असताना मला चालण्यामुळे थकवा मुळीच येणार नाही. आपले पाय धुऊन, झाडांच्या सावलीत बसून प्रसन्न मनाने मी आपल्याला वारा घालीन. तसेच सपाट जमिनीवर गवत व झाडाची पाने अंथरून ही दासी रात्रभर आपले पाय दाबत राहील.''

भगवान श्रीरामाचे चरणचिन्ह, चरणरज आणि चरणपादुकांचे दर्शन

आणि चरण सेवन यांनी भरताला किती आनंद होतो आणि त्याची कशी प्रेममुग्ध दशा होते, हे भगवान शिवाच्या शब्दांत ऐका -

**स तत्र वज्राङ्कुशवारिजाञ्चित-**
**ध्वजादिचिह्नानि पदानि सर्वतः।**
**ददर्श रामस्य भुवोऽतिमङ्गला-**
**न्यचेष्टयत्पादरजःसु सानुजः॥**
**अहो सुधन्योऽहममूनि राम-**
**पादारविन्दाङ्कितभूतलानि ।**
**पश्यामि यत्पादरजो विमृग्यं**
**ब्रह्मादिदेवैः श्रुतिभिश्च नित्यम्॥**

**(अध्यात्मरामायण २/९/२-३)**

“तेथे भरताने सगळीकडे श्रीरामचन्द्राचे वज्र, अङ्कुश, कमल आणि ध्वजा वगैरे चिह्नांनी सुशोभित आणि पृथ्वीसाठी अतिशय मंगलमय चरणचिह्ने पाहिली व ती बघून बंधू शत्रुघ्नासह तो त्यामध्ये लोळू लागला आणि मनातल्या मनात म्हणू लागला - ‘अहाहा ! मी परम भाग्यशाली आहे. कारण आज मी श्रीरामाच्या पदचिह्नांनी विभूषित झालेल्या भूमीला बघत आहे. या श्रीरामाच्या चरणधुळीला ब्रह्मादी देवता आणि श्रुती वगैरे सदा शोधत असतात.”

गोस्वामी तुलसीदास म्हणतात -

**रज सिर धरि हियँ नयनन्हि लावहिं। रघुबर मिलन सरिस सुख पावहिं॥**

**नित पूजत प्रभु पाँवरी प्रीति न हृदयँ समाति।**
**मागि मागि आयसु करत राज काज बहु भाँति॥**

“श्रीरामांची चरणधूळ मस्तकावर धरली, हृदयाला व डोळ्यांना लावली तेव्हा भरताला श्रीरामांना भेटल्यासारखा आनंद झाला. प्रभुचरणांची नित्य पूजा करताना होणारा आनंद त्याच्या हृदयात मावत नसे. तो सर्व राजकार्ये चरणपादुकांची आज्ञा घेऊन करीत असे.”

अहल्या श्रीरामाच्या चरणरजाने कृतार्थ होऊन म्हणते -

**अहो कृतार्थास्मि जगन्निवास ते**
**पादाब्जसंलग्नरजःकणादहम् ।**
**स्पृशामि यत्पद्मजशंकरादिभि-**
**र्विमृग्यते रन्धितमानसैः सदा ।।**

(अ. रा. १/५/४३)

“हे जगन्नाथा ! आपल्या चरणकमलांच्या धुळिकणांच्या स्पर्शाने आज मी कृतार्थ झाले. आपल्या ज्या चरणारविन्दांचे ब्रह्मा, शंकर आदि मन लावून चित्तात ध्यान करतात, त्या चरणकमलांना आज मी स्पर्श करीत आहे.”

भगवंतांच्या चरणांचा आश्रय घेतल्याने माणसाच्या सर्व दोषांचा नाश होतो, त्याची सारी संकटे दूर होतात आणि तो गाईच्या खुराने तयार झालेल्या खड्ड्यांतील पाण्याप्रमाणे भवसागर तरतो. श्रीमद्भागवतात म्हटले आहे -

**तावद्भयं द्रविणगेहसुहृन्निमित्तं**
**शोकः स्पृहा परिभवो विपुलश्च लोभः ।**
**तावन्ममेत्यसदवग्रह आर्तिमूलं**
**यावन्न तेऽङ्घ्रिमभयं प्रवृणीत लोकः ।।**

(३/९/६)

हे प्रभो ! जोपर्यंत खरोखर मनापासून लोक तुमच्या अभयदायी चरणकमलांचा आश्रय घेत नाहीत, तोपर्यंत धन, घर, मित्र वगैरेंच्या निमित्ताने भय, शोक, स्पृहा, पराजय आणि लोभ वगैरे उत्पन्न होतात आणि मी व माझे हे ममत्व राहाते. अर्थात् भगवंतांच्या चरणी शरण गेल्यानंतरच हे ‘मी’ पण नष्ट होते.

**समाश्रिता ये पदपल्लवप्लवं**
**महत्पदं पुण्ययशो मुरारेः ।**
**भवाम्बुधिर्वत्सपदं परं पदं**
**पदं पदं यद्विपदां न तेषाम् ।।**

(श्रीमद्भाग. १०/१४/५८)

“ज्यांनी संतांना आश्रयणीय, पवित्र यशोरूप, भगवंतांच्या

पदपल्लवरूपी जहाजाचा आश्रय घेतला आहे, त्यांच्यासाठी भवसागर, वासराचे पाऊल जमिनीवर टेकल्यावर जेवढी जागा लागते, इतका चिमुकला होतो, आणि त्यांना पदोपदी परमपद प्राप्त होते. म्हणून त्यांच्यावर कधीच संकट येत नाही.''

**त्वय्यम्बुजाक्षाखिलसत्त्वधाम्नि**
**समाधिनाऽऽवेशितचेतसैके ।**
**त्वत्पादपोतेन महत्कृतेन**
**कुर्वन्ति गोवत्सपदं भवाब्धिम् ॥**

(श्रीमद्भाग.१०/२/३०)

''हे कमलनयना ! काही संत पुरुष संपूर्ण सत्त्वाचे भांडार अशा तुमच्यात समाधिद्वारा आपले चित्त तल्लीन करून महात्म्यांकडून अनुभवलेल्या तुमच्या चरणकमलांचे जहाज करून गाईच्या वासराच्या पावला इतक्या जागेला ओलांडावे त्याप्रमाणे हा संसारसागर पार करतात.''

भगवंतांच्या चरणधुळीला शरण गेलेले प्रेमळ भक्त स्वर्गाची तर गोष्टच सोडा; पण मोक्षाचाही तिरस्कार करून चरणधुळीच्या सेवनात निमग्न होऊ इच्छितात. नागपत्नी म्हणतात -

**न नाकपृष्ठं न च सार्वभौमं**
**न पारमेष्ठ्यं न रसाधिपत्यम् ।**
**न योगसिद्धीरपुनर्भवं वा**
**वाञ्छन्ति यत्पादरजः प्रपन्नाः ॥**

(श्रीमद्भाग. १०/१६/३७)

''आपल्या चरणधुळीला शरण गेलेले भक्त स्वर्ग इच्छित नाहीत की चक्रवर्ती होऊ इच्छित नाहीत, तसेच ब्रह्मपदाची इच्छा ठेवीत नाहीत की पृथ्वीचे स्वामित्व इच्छित नाहीत किंवा त्यांना योगसिद्धींचीही इच्छा नसते. आणि त्यांना मोक्षपदाचीही इच्छा नसते.''

भगवंतांच्या केवळ पाद-सेवन-भक्तीनेच भगवंतांचे अनन्य प्रेम प्राप्त करणाऱ्या भक्तांची वर्णने शास्त्रात आहेत. म्हणूनच भगवंतांच्या पवित्र चरणी श्रद्धेने मन लावून त्यांचे नित्य सेवन करावयास हवे.



# अर्चन

**श्रीविष्णोरर्चनं ये तु प्रकुर्वन्ति नरा भुवि।**
**ते यान्ति शाश्वतं विष्णोरानन्दं परमं पदम्॥**

(विष्णुरहस्य)

"जे कोणी या जगात श्रीभगवंताची पूजा-अर्चा करतात, ते श्री भगवंतांच्या अविनाशी आनंदस्वरूप परमपदाप्रत जातात."

भगवंतांच्या भक्तांकडून ऐकलेल्या, शास्त्रात वाचलेल्या, धातू आदिपासून बनविलेली मूर्ती किंवा चित्रात पाहिलेल्या, आपल्या मनाला आवडणाऱ्या कोणत्याही भगवंतांच्या स्वरूपाचे बाह्य सामग्रीने, भगवंतांची आपल्याला आवडणारी मानसिक मूर्ती कल्पून, मानसिक सामग्रीने किंवा सर्वांभूती परमेश्वरास पाहून, सर्वांचा आदर सत्कार करून, यथायोग्य नानाविध उपचारांनी श्रद्धा व भक्तीने त्यांची सेवा-पूजा करणे आणि त्यांचे तत्त्व, रहस्य आणि प्रभाव ध्यानात आणून प्रेममुग्ध होणे म्हणजे अर्चन भक्ती होय.

पत्र, पुष्प, चंदन वगैरे सात्त्विक, पवित्र आणि न्यायोपार्जित द्रव्यांनी भगवंतांच्या प्रतिमेचे श्रद्धेने पूजन करणे, भगवंतांचे प्रेम प्राप्त व्हावे म्हणून शास्त्रोक्त विधीने यज्ञ-याग करणे, सर्वांना भगवंतांचे रूप समजून आपल्या वर्णाश्रमाप्रमाणे त्यांची यथायोग्य सेवा करणे, तसेच सत्कार, मान, पूजा वगेरेंनी संतुष्ट करणे आणि दुःखी, अनाथ, अपंग, पीडित प्राण्यांना भुकेलेल्यांना अन्नाने, तहानलेल्यांना पाण्याने, वस्त्रहीनांना वस्त्राने, रोग्यांना औषधी वगैरेंनी, अनाथांना आश्रय देऊन, यथावश्यक, यथाशक्ती, श्रद्धा आणि सत्कारपूर्वक सर्वांना भगवंताचे स्वरूप समजून भगवंताच्या प्राप्तीसाठी सेवा करणे, हे सगळे भगवंतांच्या बाह्य सेवेचे प्रकार आहेत.

शास्त्रात वर्णन केलेल्या, आपल्याला आवडणाऱ्या भगवंताच्या अलौकिक रूप-लावण्ययुक्त, अनन्त-सौंदर्य-माधुर्यमय परम तेजोमण्डित स्वरूपाच्या प्रत्येक अवयवाचे वस्त्राभूषण, आयुध वगैरेंनी युक्त आणि

हाता-पायांच्या मंगल चिह्नांसहित मनाने चिन्तन करुन आनंदाने मनात आवाहन करून, व मनातच स्थापना करून, नानाविध मानसिक सामग्रींनी अत्यंत श्रद्धेने व प्रेमाने पूजन करणे हा मानस-पूजेचा प्रकार आहे.

भगवंतांठायी अनन्य प्रेम जडून सर्वांना त्याची प्राप्ती व्हावी, या उद्देशाने अत्यंत श्रद्धापूर्वक आचरण करावे किंवा करवावे, हाच यामागील हेतु आहे.

अर्चन-भक्तीचे स्वरूप आणि तत्त्व जाणण्यासाठी भगवंतांच्या प्रेमळ भक्तांचा संग करावयास हवा, सेवन करावयास हवे.

वरील प्रकारे भगवंतांची पूजा केल्याने माणसाला जे हवे, ते मिळते आणि अनायासेच भगवंतांची प्राप्ती होते. श्रीमद्भागवतात म्हटले आहे-

**स्वर्गापवर्गयोः पुंसां रसायां भुवि सम्पदाम्।**
**सर्वासामपि सिद्धीनां मूलं तच्चरणार्चनम्॥**

(१०/८१/१९)

''श्रीभगवंतांच्या चरणांचे पूजन-अर्चन करणे, जीवांसाठी स्वर्ग आणि मोक्षाचे तसेच मर्त्यलोक आणि पाताळलोकात असलेल्या सगळ्या संपत्तीचे आणि सिद्धींचेही मूळ आहे.''

आप-आपल्या कर्माप्रमाणे भगवंतांची पूजा करण्याने भगवंतांची प्राप्ती होते, असे स्वतः भगवंतांनी गीतेत सांगितले आहे.

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम्।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः॥**

(१८/४६)

''हे अर्जुना ज्या परमेश्वरापासून सगळ्या प्राण्यांची उत्पत्ती झाली आहे व ज्या परमेश्वराने हे सगळे जग व्यापले आहे, त्या परमेश्वराची आपल्या स्वाभाविक कर्मांद्वारा पूजा करून माणूस परमसिद्धी प्राप्त करतो.''

एवढेच नाही तर अत्यंत श्रद्धेने व प्रेमाने भगवंताची पूजा केली गेली, तर भगवंत स्वतः आपल्या दिव्य मंगल-विग्रह स्वरूपात प्रगट

होऊन भक्ताने अर्पण केलेले सर्व पदार्थ ग्रहण करतात. भगवंत स्वतः म्हणतात-

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः॥**

(९/२६)

“हे अर्जुना ! जो कोणी भक्त माझ्यासाठी पान, फूल, फळ, जळ वगैरे प्रेमाने अर्पण करतो, त्या शुद्ध अंतःकरणाच्या प्रेमळ भक्ताने प्रेमाने व निष्काम भक्तीने अर्पण केलेले ते पत्र-पुष्प वगैरे मी सगुण रूपात प्रगट होऊन प्रेमाने खातो.”

राजा पृथू, अम्बरीष वगैरे बऱ्याच जणांनी नाना उपचारांसहित मन:पूर्वक भगवंतांची पूजा केली आणि अनायासे त्यांना भगवंतांची प्राप्ती झाली. त्यांचेच कशाला, नाना उपचारांशिवायही केवळ भक्तिभावाने पूजा करणाऱ्या सुदाम्याच्या फक्त पोह्याच्या कणांनी, गजेन्द्राच्या एका फुलाने, द्रौपदीच्या भाजीच्या एका पानाने भगवंतांना पुजून त्यांनी परम सिद्धी मिळविली. शबरीसारखी हलक्या जातीची स्त्रीसुद्धा केवळ बोराने भगवंतांना संतुष्ट करून परमपदाला पोचली.

म्हणून भगवंतांच्या प्रेमात मग्न होऊन श्रद्धेने आप-आपल्या आवडीप्रमाणे आणि भावनेप्रमाणे भगवंतांची पूजा करावयास हवी.



# वन्दन

**ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं**
**तीर्थास्पदं शिवविरिञ्चिनुतं शरण्यम्।**
**भृत्यार्तिहं प्रणतपाल भवाब्धिपोतं**
**वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम्॥**

**(श्रीमद्भाग. ११/५/३३)**

“हे पुरुषोत्तमा ! हे प्रभो ! जे नेहमी ध्यान करण्यायोग्य आहेत, तिरस्कार नाहीसा करणारे आहेत, सगळे मनोरथ पूर्ण करणारे आहेत,

जे सगळ्या तीर्थांचा आधार आहेत, ज्यांना शिव आणि ब्रह्मा नमस्कार करतात आणि जे शरणागताचे रक्षण करण्यात प्रवीण आहेत, जे सेवकांची संकटे दूर करतात, नमस्कार करणाऱ्यांचे रक्षक आहेत आणि जे भवसागराचे जहाज आहेत, अशा तुमच्या चरण कमलांना मी वन्दन करतो.''

भगवंताचे शास्त्रात वर्णन केलेले स्वरूप, भगवंताचे नाम, भगवंताची धातू वगैरेची मूर्ती, चित्र किंवा मानसिक मूर्तीला शरीराने किंवा मनाने श्रद्धेने साष्टांग दण्डवत करणे किंवा सगळ्या चराचराला, भूतमात्राला परमेश्वराचे स्वरूप समजून श्रद्धेने शरीराने किंवा मनाने प्रणाम करणे आणि त्याचवेळी भगवत्प्रेमाने मुग्ध होणे ही वन्दनभक्ती होय.

देवाच्या देवळात जाऊन श्रद्धेने आणि भक्तीने भगवंताच्या मूर्तीला साष्टांग दण्डवत घालणे, आप-आपल्या घरात भगवंताची प्रतिमा किंवा चित्र, भगवंताचे नाम, भगवंतांचे चरण आणि चरणपादुकांचे, भगवंताचे तत्त्व, रहस्य, प्रेम, प्रभाव आणि भगवंताच्या मधुर लीलांचे ज्यामध्ये वर्णन आहे, अशा सत् शास्त्रांचे आणि सगळ्या चराचर जीवांना भगवंताचे स्वरूप समजून किंवा त्यांच्या हृदयात भगवंतांचा वास समजून विनयाने श्रद्धा-भक्ति-सहित गद्‌गदून प्रमाण करणे, हा वन्दनभक्तीचा प्रकार आहे. श्रीमद्भागवतात योगीश्वर कवी म्हणतात -

**खं वायुमग्निं सलिलं महीं च**
**ज्योतींषि सत्त्वानि दिशो द्रुमादीन्।**
**सरित्समुद्रांश्च हरेः शरीरं**
**यत्किञ्च भूतं प्रणमेदनन्यः॥**

(११/२/४१)

''आकाश, वायू, अग्नी, जल, पृथ्वी, नक्षत्र, दिशा, वृक्ष-वेली वगैरे, नद्या, समुद्र आणि संपूर्ण भूतमात्र भगवंतांचे शरीर आहे. म्हणून भगवंतांच्या अनन्य भक्ताने सर्व जगाला भगवद्भावाने प्रणाम करावा.''

भगवंतांना सर्वभूती आणि सगळीकडे पाहून कसा नमस्कार करावयास हवा, यासाठी अर्जुनाचे उदाहरण फार सुन्दर आहे. अर्जुन भगवंतांना नमस्कार करताना म्हणाला -

**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते**
**नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।**
**अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं–**
**सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः॥**

(गीता ११/४०)

"हे अनन्त सामर्थ्यशाली ! आपल्याला मागून व पुढूनही नमस्कार असो. हे सर्वात्मन ! आपल्याला चहूकडून नमस्कार असो. कारण अनन्त पराक्रमशाली अशा आपण सगळ्या जगाला व्याप्त केलेले आहे. म्हणून आपणच सर्वरूप आहात."

श्री तुलसीदासजी महाराज सगळ्या जगाला 'सीय - राममय' समजून नमस्कार करतात. -

**सीय राममय सब जग जानी। करउँ प्रनाम जोरि जुग पानी॥**

भगवंतांवर अनन्य प्रेम जडून भगवंतांना प्राप्त करणे, हा भक्तीचा उद्देश आहे. भगवंतांच्या प्रेमळ भक्तांचा सहवास आणि सेवन करून त्या द्वारा भगवंतांच्या वंदन भक्तीचे रहस्य, प्रभाव आणि तत्त्व समजल्याने या वन्दन भक्तीची प्राप्ती होते.

भगवंतांचे रहस्य समजून त्यांना नमस्कार करणारा सगळ्या दुःखांपासून मुक्त होतो.

अनुस्मृतीचे वचन आहे -

**न वासुदेवात्परमस्ति मङ्गलं**
**न वासुदेवात्परमस्ति पावनम्।**
**न वासुदेवात्परमस्ति दैवतं**
**तं वासुदेवं प्रणमन्न सीदति॥**

"भगवान वासुदेवाशिवाय दुसरे काही मङ्गलमय नाही, वासुदेवाहून अधिक दुसरे काही पवित्र (पावन) नाही. म्हणून वासुदेवापेक्षा श्रेष्ठ दुसरे दैवत नाही, त्या वासुदेवाला नमस्कार करणारा कधी दुःखी होत नाही."

श्रद्धा आणि प्रेमपूर्वक भगवंताला केवळ साष्टांग प्रणाम केल्याने

सुद्धा मनुष्य सर्व पापापासून मुक्त होऊन परमपदाला प्राप्त होतो. जसे–

**एकोऽपि कृष्णस्य कृत: प्रणामो**
**दशाश्वमेधावभृथेन तुल्य:।**
**दशाश्वमेधी पुनरेति जन्म**
**कृष्णप्रणामी न पुनर्भवाय।**

(भीष्मस्तवराज ९१)

"भगवान श्रीकृष्णाला केलेला एक नमस्कार दहा अश्वमेधयज्ञांच्या अवभृथस्नानांसमान आहे, (इतकेच नाही, तर विशेष असे आहे की,) दहा अश्वमेध करणाऱ्याला पुनर्जन्म घ्यावा लागतो, पण भगवान श्रीकृष्णाला नमस्कार करणाऱ्याला पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही.".

श्रद्धेने भगवंतांना नमस्कार करणाऱ्याची गोष्टच सोडा; पण कुठल्याही अवस्थेत भगवंतांना नमस्कार केल्यानेसुद्धा सर्व पापांचा नाश होतो.

**पतित: स्खलितश्चार्त: क्षुत्त्वा वा विवशो ब्रुवन्।**
**हरये नम इत्युच्चैर्मुच्यते सर्वपातकात्॥**

(श्रीमद्भाग. १२/१२/४६)

"पतित, स्खलित, आर्त, शिंक आली असता किंवा कुठल्याही प्रकारे परवश झालेला पुरुषसुद्धा जर उच्च स्वरात 'हरये नम:' असे म्हणाला, तर तो सर्व पापांपासून मुक्त होतो."

भगवंतांचे अनेक भक्त अशा प्रकारे केवळ नमस्कार केल्याने परमपदास प्राप्त झाले. पहा, अक्रूर कशाप्रकारे मुग्ध होऊन नमस्कार करतो.

**रथात्तूर्णमवप्लुत्य सोऽक्रूर: स्नेहविह्वल:।**
**पपात चरणोपान्ते दण्डवद्रामकृष्णयो:॥**

(श्रीमद्भाग. १०/३८/३४)

"अक्रूराने प्रेमविह्वल होऊन चटकन रथातून उडी मारून भगवान बलराम आणि श्रीकृष्णांच्या चरणावर लोळण घेतली."

पितामह भीष्म सद्गदित होऊन भगवंतांना नमस्कार करतात आणि

भगवंत सुद्धा तत्काल त्यांना आपले दिव्य ज्ञान देतात. वैशम्पायन मुनी म्हणतात,

**एतावदुक्त्वा वचनं भीष्मस्तद्गतमानसः।**
**नम इत्येव कृष्णाय प्रणाममकरोत्तदा।।**
**अभिगम्य तु योगेन भक्तिं भीष्मस्य माधवः।**
**त्रैलोक्यदर्शनं ज्ञानं दिव्यं दत्त्वा ययौ हरिः।।**

**(भीष्मस्तवराज १००-१०१)**

"ज्याचे मन भगवंतांच्या ठिकाणी तन्मय झाले आहे, अशा भीष्माने अनेक प्रकारे भगवंतांची स्तुती केल्यानंतर 'नमः कृष्णाय' असे म्हणून त्यांनी भगवंतांना प्रणाम केला. तेव्हा भगवान श्रीकृष्णाने योगशक्तिद्वारा भीष्माची भक्ती समजून त्यांना भगवत्स्वरूप प्रत्यक्ष करविणारे दिव्य ज्ञान दिले."

म्हणून भगवंतांच्या प्रेमात विभोर होऊन वरील प्रकारे भगवंतांची वन्दना-भक्ती करण्याचा प्रयत्न करावयास हवा.



# दास्य

**सो अनन्य जाकें असि मति न टरइ हनुमंत।**
**मैं सेवक सचराचर रूप स्वामि भगवंत।।**

"हे हनुमंता ! मी सेवक असून हे चराचर जगत माझ्या स्वामींचे-भगवंतांचे-रूप आहे, या विचारापासून ज्याची बुद्धी कधीच ढळत नाही, तो अनन्य भक्त होय."

भगवंतांचे गुण, तत्त्व, रहस्य आणि प्रभाव समजून श्रद्धेने त्यांची सेवा करणे आणि त्यांच्या आज्ञेचे पालन करणे दास्यभक्ती आहे.

देवाच्या देवळात काम करणे, झाडलोट करणे, मूर्तींची सेवा करणे, भगवंतांच्या स्वरूपाचे मनात ध्यान धरून त्यांची सेवा करणे, सगळ्या विश्वाला, चराचराला भगवंतांचे स्वरूप समजून सर्वांची यथाशक्ती यथायोग्य सेवा करणे, गीता, वगैरे शास्त्रांना भगवंतांची आज्ञा समजून त्यानुसार

आचरण करणे आणि ज्यामुळे भगवंत प्रसन्न होतील, जे भगवंतांना आवडेल, असे काम करणे हे सगळे दास्यभक्तीचे प्रकार आहेत.

भगवंतांचे रहस्य जाणणाऱ्या प्रेमळ भक्तांचा सहवास आणि सेवनाने दास्यभक्ती प्राप्त होते.

भगवंतांवर अनन्य प्रेम जडून त्यांची प्राप्ती व्हावी, म्हणून सदैव भगवंतांच्या समीप राहण्याच्या उद्देशाने दास्यभक्ती केली जाते.

केवळ या दास्यभक्तीनेही माणसाला अनायासे भगवंतांची प्राप्ती होते.

गोस्वामी तुलसीदास तर म्हणतात की, दास्यभावाशिवाय या भवसागरातून उद्धार होऊ शकत नाही.

**सेवक सेब्य भाव बिनु भव न तरिअ उरगारि।**
**भजहु राम पद पंकज अस सिद्धांत बिचारि॥**

" हे गरुडा ! सेवक-सेव्यभावाशिवाय संसारसागरातून तरता येत नाही. हा सिद्धांत लक्षात घेऊन श्री रामचरणकमलांचे भजन कर."

श्रीलक्ष्मण, हनुमान, अङ्गद वगैरे या दास्यभक्तीची आदर्श उदाहरणे आहेत. भगवान श्रीराम वनात जावयास निघाले, त्यावेळी लक्ष्मणाची जी दशा झाली, त्याचे वर्णन करताना गोस्वामी म्हणतात-

**उतरु न आवत प्रेम बस गहे चरन अकुलाइ।**
**नाथ दासु मैं स्वामि तुम्ह तजहु त काह बसाइ॥**

"प्रेमामुळे लक्ष्मणाला काही बोलणे सुचेना. त्याने व्याकुळ होऊन श्रीरामांचे पाय धरले आणि म्हणाला, हे नाथ! मी सेवक आणि आपण माझे स्वामी. म्हणून आपणच मला सोडले तर मी काय बोलणार?"

सुमित्रा मातेने लक्ष्मणाला श्रीरामासोबत जाऊन त्यांची सेवा करण्याचा किती सुंदर उपदेश केला आहे.

**रागु रोषु इरिषा मदु मोहू। जनि सपनेहुँ इन्ह के बस होहू॥**
**सकल प्रकार बिकार बिहाई। मन क्रम बचन करेहु सेवकाई॥**
**जेहिं न रामु बन लहहिं कलेसू। सुत सोइ करेहु इहइ उपदेसू॥**

"प्रेम, राग, ईर्ष्या, मद आणि मोह यांच्या आधीन स्वप्नातही होऊ नकोस. सर्व प्रकारच्या विकारांचा त्याग करून मनाने, कृतीने आणि बोलण्याने श्रीसीतारामांची सेवा कर. ज्यामुळे वनात श्रीरामांना कष्ट होणार नाहीत, असा वाग. हाच माझा तुला उपदेश आहे."

श्रीहनुमंताचे सगळे जीवनच दास्य-भक्तीने ओतप्रोत आहे. पहिल्यांदाच ऋष्यमूक पर्वतावर भगवान श्रीरामांना ओळखून हनुमंत म्हणतात-

**एकु मैं मंद मोहबस कुटिल हृदय अग्यान।**
**पुनि प्रभु मोहि बिसारेउ दीनबंधु भगवान॥**

**जदपि नाथ बहु अवगुन मोरें। सेवक प्रभुहि परै जनि भोरें॥**
**नाथ जीव तव मायाँ मोहा। सो निस्तरइ तुम्हारेहिं छोहा॥**
**सेवक सुत पति मातु भरोसें। रहइ असोच बनइ प्रभु पोसें॥**

" हे दीनबंधू भगवान ! पहिली गोष्ट म्हणजे मी मतिमंद आहे. शिवाय मोहाधीन आहे. तसेच अंतःकरणाचा कपटी आणि अज्ञानी आहे. पण आपणही मला विसरलात ! जरी माझ्या ठिकाणी अनेक अवगुण असले, तरी सेवकाचा स्वामींना विसर पडता कामा नये. हे नाथ ! जीव तुमच्या मायेने मोहित झालेला आहे. तोही तुमच्याच कृपेने त्यातून तरून जाऊ शकतो. सेवक स्वामींच्या आणि मुलगा आईच्या भरवशावर निश्चिन्त असतो, म्हणून स्वामींना सेवकाचे पालन-पोषण करावेच लागते."

भगवंतसुद्धा आपल्या सेवक-वत्सलतेचा परिचय करवत हनुमंताला उठवून हृदयाशी कवटाळतात आणि प्रेमाश्रूंनी त्याचे अंग भिजवून म्हणतात.

**सुनु कपि जियँ मानसि जनि ऊना। तैं मम प्रिय लछिमन ते दूना॥**
**समदरसी मोहि कह सब कोऊ। सेवक प्रिय अनन्यगति सोऊ॥**

"हनुमंता ऐक ! मनात खिन्न होऊ नकोस. तू मला लक्ष्मणाहूनही अधिक प्रिय आहेस. सर्वजण मला खुशाल समदर्शी म्हणोत. पण मला सेवकच प्रिय आहे. कारण त्याला दुसरा आधार नसतो."

दास्यभक्तीचा भक्त आपल्या स्वामीच्या कृपेविषयी किती विश्वस्त असतो, यासंबंधी हनुमंताने बिभीषणाला जे काही सांगितले, ते ध्यानात ठेवण्यासारखे आहे.

**सुनहु बिभीषन प्रभु कै रीती। करहिं सदा सेवक पर प्रीती॥**
**कहहु कवन मैं परम कुलीना। कपि चंचल सबहीं बिधि हीना॥**
**अस मैं अधम सखा सुनु मोहू पर रघुबीर।**
**कीन्ही कृपा सुमिरि गुन भरे बिलोचन नीर॥**

"हे बिभीषणा, प्रभूंची वागण्याची पद्धत ऐक. ते सेवकांवर नेहमीच प्रेम करतात. मी अत्यंत कुलीन आहे, असे कवी खुशाल म्हणोत. पण मी चंचल स्वभावाचा आणि सर्व दृष्टींनी हीन आहे. मित्रा ऐक. असा मी अधम असलो, तरी श्रीरघुवीरांनी माझ्यावर कृपा केली. त्यांचे गुण आठवून श्रीहनुमंताचे डोळे भरून आले."

अङ्गदाला जेव्हा भगवंत श्रीराम अयोध्येतून परत जाण्यास सांगतात, तेव्हा अङ्गद भगवंतांना प्रार्थना करतो -

**मोरें तुम्ह प्रभु गुर पितु माता। जाउँ कहाँ तजि पद जलजाता॥**
**तुम्हहि बिचारि कहहु नरनाहा। प्रभु तजि भवन काज मम काहा॥**
**बालक ग्यान बुद्धि बल हीना। राखहु सरन नाथ जन दीना॥**
**नीचि टहल गृह कै सब करिहउँ। पद पंकज बिलोकि भव तरिहउँ॥**

"हे प्रभू ! आपणच माझे गुरू व आईवडील आहात. तुमच्या चरणकमलांना सोडून कुठे जाऊ ? हे नरनाथ ! आपणच विचार करून सांगा. प्रभूंना सोडून माझे घरी काय काम आहे ? ज्ञान, बुद्धी आणि बळ नसलेला मी बालक आहे. हे नाथा ! मज दीनाला आपला आश्रय द्या. मी आपल्या घरची हलक्यातली हलकी सेवा करीन आणि तुमचे चरणकमल पाहूनच मी संसार तरून जाईन."

अशी अनेक उदाहरणे आहेत, म्हणून सर्वांनी भगवंतांच्या प्रेमात विव्हल होऊन तन, मन, धन सगळे अर्पण करून भगवंतांची दास्यभक्ती करावी.



# सख्य

**अहो भाग्यमहो भाग्यं नन्दगोपव्रजौकसाम्।**
**यन्मित्रं परमानन्दं पूर्णं ब्रह्म सनातनम्॥**

(श्रीमद्भाग. १०/१४/३२)

"त्या नंद गोपांच्या व्रज भूमीत राहाणारे लोक धन्य-धन्य आहेत. ज्यांचे मित्र परमानन्दपरिपूर्ण सनातन ब्रह्म आहेत."

भगवंताचा प्रभाव, तत्त्व, रहस्य आणि महिमा समजून अत्यंत विश्वासाने मित्रभावाने त्यांच्या आवडीप्रमाणे होऊन जाणे, तन्मय होऊन प्रेम करणे आणि त्यांचे गुण, रूप व लीलांवर मुग्ध होऊन नित्य-निरन्तर प्रसन्न राहाणे सख्य-भक्ती आहे.

आपले आवश्यक काम सोडून प्रिय प्रेमीचे काम आदराने करणे, त्याच्या कामासमोर आपले काम तुच्छ समजून बेपर्वा होणे, त्याच्यासाठी खूप परिश्रम करूनही ते थोडेच मानणे, तो ज्यामुळे प्रसन्न होईल ती गोष्ट लक्षात ठेवून सतत त्यासाठी प्राण असे पर्यंत प्रयत्न करणे, तो जे काही करील त्यात संतुष्ट राहाणे, आपली कुठलीही वस्तू त्याच्या कामी आली, तर प्रसन्न होणे, आपल्या शरीरावर आणि आपल्या वस्तूंवर जसा आपला हक्क, आत्मीयता असते, तशीच आपल्या लाडक्या प्रियाचीही समजावी. आणि तसेच त्याच्या शरीरावर आणि वस्तूंवर आपला हक्क, आत्मीयता ठेवावी. आपले धन, जीवन आणि शरीर प्रियाच्या कामी आले, तर त्यात धन्यता मानावी. सतत त्याच्या सहवासात राहावयाची इच्छा ठेवावी, त्याचे दर्शन, भाषण, चिन्तन आणि स्पर्शात रममाण होणे, त्याचे नाम, रूप, गुण आणि चरित्र ऐकून, सांगून, वाचून आणि आठवून अत्यंत प्रसन्न होणे, कुण्या मित्राकडून संदेश मिळताच प्रसन्न होणे आणि त्याच्या वियोगात व्याकुळ होणे आणि क्षणोक्षणी त्याला भेटण्याची आशा करत वाट पाहाणे वगैरे सखाभावाचे प्रकार आहेत.

प्रियाला सुख लाभून आपला सख्यभाव पूर्णपणाने वाढावा आणि कधीही त्याचा वियोग होऊ नये, या उद्देशानेच सख्य-भक्ती केली जाते.

सख्य-भक्तीच्या प्राप्तीसाठी भगवंतांच्या प्रेमळ सख्यांचा संग, सेवन त्याच्या जीवनचरित्राचे अध्ययन आणि त्याचे व भगवंताचे गुण, लीला आणि प्रभावाचे त्याच्या प्रेमळ भक्तांकडून श्रवण करावयास हवे.

अशा प्रकारच्या केवळ सख्य-भक्तीनेही मनुष्याच्या दुःख आणि दोषांचा नाश होऊन भगवंतांची प्राप्ती होते आणि भगवंतांवर प्रेम जडते. शेवटी भगवान त्या प्रेमळ भक्ताच्या आधीन होतो आणि मग त्याला अतिशय आनन्द होऊन शांती मिळते.

मित्राचे मित्रासाठी काय कर्तव्य आहे, याविषयी भगवान श्रीराम सखा सुग्रीवास म्हणतात -

**जे न मित्र दुख होहिं दुखारी। तिन्हहि बिलोकत पातक भारी॥**
**निज दुख गिरि सम रज करि जाना। मित्रक दुख रज मेरु समाना॥**
**जिन्ह कें असि मति सहज न आई। ते सठ कत हठि करत मिताई॥**
**कुपथ निवारि सुपंथ चलावा। गुन प्रगटै अवगुनन्हि दुरावा॥**
**देत लेत मन संक न धरई। बल अनुमान सदा हित करई॥**
**बिपति काल कर सतगुन नेहा। श्रुति कह संत मित्र गुन एहा॥**

''जे लोक मित्राच्या दुःखाने दुःखी होत नाहीत, त्यांना पाहूनही मोठे पाप लागते. आपले पर्वताएवढे दुःख धुळीच्या कणाएवढे व मित्राचे धुळीच्या कणाएवढे दुःख मेरू पर्वताएवढे मानावे. ज्यांना निसर्गतःच अशी बुद्धी होत नाही, ते मूर्ख जबरदस्तीने का बरे एखाद्याशी मैत्री करतात ? मित्राचा धर्म हा आहे की, त्याने मित्राला कुमार्गापासून परावृत्त करून सन्मार्गाला लावावे. त्याचे गुण प्रकट करून अवगुण लपवावे. देण्या-घेण्यात संकोच बाळगू नये. आपल्या शक्तीनुसार नेहमी मित्राचे कल्याण करावे. संकटाच्या वेळी तर अधिक प्रेम करावे. सन्मित्राचे हे गुण आहेत, असे श्रुती सांगते.''

या सख्य-भक्तीची उदाहरणे म्हणजे श्रीबिभीषण, सुग्रीव, उद्धव, अर्जुन, सुदामा, श्रीदामादी व्रजसखा वगैरे.

लंकाविजयानंतर बिभीषण इच्छित होता की, भगवंतांनी एकदा माझ्या घरी येऊन मला कृतार्थ करावे आणि त्यासाठी त्याने भगवंताना प्रार्थना केली. सख्याची गोष्ट ऐकून भगवंत प्रेमविभोर होऊन त्यांच्या नेत्रात प्रेमाश्रू दाटले व ते म्हणाले, बंधू ! तुझे जे काही आहे, ते सगळे माझेच आहे. पण आत्ता या वेळी भरताची दशा आठवून मी थांबू शकत नाही.

**तोर कोस गृह मोर सब सत्य बचन सुनु भ्रात।**
**भरत दसा सुमिरत मोहि निमिष कल्प सम जात ॥**

"हे बंधो ! ऐक. तुझा खजिना, घर वगैरे सर्व माझेच आहे, हे खरे; पण भरताची अवस्था आठवल्यावर मला एकेक पळ कल्पासारखे वाटते."

सुग्रीवाबरोबर सखाभाव झाल्यावर भगवंत आपल्या प्राणप्रिय सीतेला विसरून आधी सुग्रीवाची चिन्ता करू लागले.

**तिय बिहरी सुग्रीव सखा, लाखे प्रानप्रिया बिसराई।**

"मित्र सुग्रीवाची ती स्थिती पाहून प्रभू प्राणप्रिय सीतेलाही विसरले."

आणि सुग्रीवाला म्हणतात -

**सखा सोच त्यागहु बल मोरें। सब बिधि घटब काज मैं तोरें॥**

"हे मित्रा ! माझ्या शक्तीवर भरवसा ठेवून तू सर्व काळजी सोडून दे. मी सर्व तऱ्हेने तुला मदत करीन."

**न तथा मे प्रियतम आत्मयोनिर्न शङ्करः।**
**न च सङ्कर्षणो न श्रीर्नैवात्मा च यथा भवान्॥**

**(श्रीमद्भाग. ११/१४/१५)**

उद्धवावर भगवंतांचे एवढे प्रेम होते की, एकदा ते त्याला म्हणाले, 'बंधो उद्धवा ! तुझ्यासारखे प्रेमी मला जितके प्रिय आहेत, तेवढे प्रिय मला, ब्रह्मा, शंकर, संकर्षण, लक्ष्मी आणि माझा आत्मासुद्धा नाही.'

उद्धवाचा श्रीकृष्णाच्या ठिकाणी फार सख्यभाव होता. म्हणून भगवंत त्याच्यापासून मनातील कोणतीही गोष्ट लपवत नसत. आपल्या लाडक्या प्रेमिकांना (गोपींना) संदेश पाठविण्यासाठी भगवंतांनी उद्धवालाच सगळ्यात उत्तम म्हणून निवडले. त्यावेळचे वर्णन करताना श्री शुकदेव म्हणतात -

**वृष्णीनां प्रवरो मन्त्री कृष्णस्य दयितः सखा।**
**शिष्यो बृहस्पतेः साक्षादुद्धवो बुद्धिसत्तमः॥**
**तमाह भगवान् प्रेष्ठं भक्तमेकान्तिनं क्वचित्।**
**गृहीत्वा पाणिना पाणिं प्रपन्नार्तिहरो हरिः॥**
**गच्छोद्धव व्रजं सौम्य पित्रोर्नौ प्रीतिमावह।**
**गोपीनां मद्वियोगाधिं मत्संदेशैर्विमोचय॥**

**(श्रीमद्भाग. १०/४६/१-३)**

''यदुवंशाचे श्रेष्ठ मंत्री, साक्षात बृहस्पतीचे शिष्य आणि अत्यंत बुद्धिमान उद्धव भगवान श्रीकृष्णाचे परम प्रिय सखा होते. शरणागतांचे दुःख दूर करणाऱ्या भगवान श्रीकृष्णाने एक दिवस आपल्या अत्यंत प्रिय भक्त उद्धवाचा हात पकडून म्हटले, ''लाडक्या उद्धवा ! तू ब्रज भूमीत जाऊन माझ्या माता-पित्याला प्रसन्न कर आणि माझा संदेश सांगून गोपींना वियोगरोगातून मुक्त कर.''

अर्जुनाच्या सख्यभावाची तर भगवंत स्वतःच घोषणा करतात -

**'भक्तोऽसि मे सखा चेति'**—तू माझा भक्त आणि सखा आहेस.

**(गीता ४/३)**

**'इष्टोऽसि मे दृढमिति'**—तू माझा परम प्रिय आहेस.

**(गीता १८/६४)**

अश्वत्थाम्याने उत्तरेच्या गर्भस्थ बालकाला परीक्षितीला मारले, तेव्हा भगवान श्रीकृष्ण म्हणतात,

**यथाहं नाभिजानामि विजयेन कदाचन।**
**विरोधं तेन सत्येन मृतो जीवत्वयं शिशुः॥**

(महा. अश्वमेध. ६९/२१)

"जर हे सत्य असेल की, मी समजून-उमजून अर्जुनाबरोबरच्या मैत्रीत कुठलीही उणीव येऊ दिली नसेल, तर हे मृत बालक जिवन्त होईल."

मित्र सुदाम्याला पाहून भगवंत प्रेमविह्वल होऊन सुदाम्याचा कसा आदर-सत्कार करतात, हे सांगताना श्री शुकदेव म्हणतात -

**सख्युः प्रियस्य विप्रर्षेरङ्गसङ्गातिनिर्वृतः।**
**प्रीतो व्यमुञ्चदब्बिन्दून् नेत्राभ्यां पुष्करेक्षणः॥**
**अथोपवेश्य पर्यङ्के स्वयं सख्युः समर्हणम्।**
**उपहृत्यावनिज्यास्य पादौ पादावनेजनीः॥**
**अग्रहीच्छिरसा राजन् भगवाँल्लोकपावनः।**
**व्यलिम्पद् दिव्यगन्धेन चन्दनागुरुकुङ्कुमैः॥**

(श्रीमद्भाग. १०/८०/१९-२१)

'कमलनयन भगवान् श्रीकृष्ण आपला प्रिय सखा ब्रह्मर्षी सुदाम्याच्या अङ्गस्पर्शाने अत्यंत हर्षित झाले आणि त्यांच्या नेत्रातून प्रेमाश्रू ओघळू लागले. नंतर त्यांनी त्याला स्वतःच्या हाताने शय्येवर बसविले आणि स्वतःच्या हाताने त्याचे चरण धुऊन त्याची पूजा केली. लोकपावन भगवंतांनी त्याचे चरणोदक आपल्या मस्तकी ठेवले आणि त्याच्या शरीरावर दिव्य गंध, चन्दन, अगुरू आणि कुङ्कुम वगैरे लावले.'

भगवंतांच्या प्रिय सख्यांची गोष्टच सोडा. पण भिल्लांचा राजा गुहसुद्धा भगवंतांशी सख्य जोडून भवसागर तरून गेला.

म्हणून भगवंतांनाच आपला एकमात्र प्रियतम समजून, त्यालाच आपले सर्वस्व मानून अत्यंत प्रेमाने सख्य-भक्ती करावयास हवी.



# आत्मनिवेदन

वासुदेवाश्रयो मर्त्यो वासुदेवपरायणः।
सर्वपापविशुद्धात्मा याति ब्रह्म सनातनम्॥

(वि. स. १३०)

'ज्या माणसाने भगवान वासुदेवाचा आश्रय घेतला आहे आणि जो तत्परायण आहे, त्याचे अन्तःकरण सर्वथैव शुद्ध होते आणि तो सनातन ब्रह्म प्राप्त करतो.'

परमात्म्याचे तत्त्व, रहस्य, प्रभाव आणि महिमा समजून निरहंकारी होऊन आपल्या तन-मन-धन-जनासहित स्वतःला आणि आपल्या सगळ्या कर्मांना श्रद्धा आणि प्रेमाने परमात्म्याला समर्पण करणे, म्हणजेच आत्मनिवेदन-भक्ती होय.

हानी-लाभ, जय-पराजय, यश-अपयश, मान-अपमान, सुख-दुःख वगैरे जे मिळेल, त्याला भगवंतांनी धाडलेले बक्षीस समजून प्रसन्न राहणे, तन-मन, स्त्री-पुत्र वगैरे सर्वांवर अहंकाररहित ममता, भगवंत यंत्र चालविणारे आहेत आणि मी त्यांच्या हातचे यंत्र आहे, असा निश्चय करून कठपुतळीप्रमाणे भगवंतांच्या इच्छेनुसार सर्व करणे, भगवंतांचे रहस्य आणि प्रभाव समजण्यासाठी त्यांचे नाव, रूप, गुण, लीलांचे श्रवण, मनन, कथन, अध्ययन आणि चिन्तनात श्रद्धा आणि भक्तीने मन लावणे, इन्द्रिय, मन, बुद्धी वगैरे सर्वांवर एकमात्र भगवंतांचाच अधिकार समजणे, भगवंताची वस्तूच भगवंतांना अर्पण केली आहे अशी भावना होणे, कुठल्याही प्रकारे भगवंतांची सेवा घडते, यात आनंद मानणे, सर्व काही भगवंतांना अर्पण करून, स्वाद, चैन, विलास, आराम, भोग वगैरेंची इच्छा न होणे, सदा-सर्वदा सगळ्या ठिकाणी भगवंताचांच अनुभव करणे, भगवंतांच्या इच्छेशिवाय दुसरी कुठलीही वेगळी इच्छा न ठेवणे, भगवंतांच्या भरवशावर सदैव निर्भय, निश्चिन्त आणि प्रसन्न राहाणे आणि भगवद्भक्ती सोडून मुक्तीचीसुद्धा इच्छा न करणे, वगैरे सर्व या आत्मनिवेदन भक्तीचेच प्रकार आहेत.

भगवंतांच्या ठायी अनन्य प्रेम आणि त्यांच्या प्राप्तीसाठी ही आत्मनिवेदन-भक्ती केली जाते.

भगवंताना शरण गेलेल्या प्रेमळ भक्तांचा संग, सेवन करण्याने आणि त्यांच्याकडून भगवंतांचे नाव, रूप, गुण, प्रभाव, तत्त्व, महिमा वगैरेंचे श्रवण आणि मनन करण्याने ही भक्ती प्राप्त होते.

स्वत: भगवंतांनी या आत्मनिवेदनरूपा शरण-भक्तीचे महत्त्व प्रगट करताना त्याच्या फळाविषयी गीतेत प्रशंसा केली आहे. ते म्हणतात -

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते।।**

(७/१४)

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु: पापयोनय:।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्।।**

(९/३२)

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायण:।।**

(९/३४)

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत।**
**तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम्।।**

(१८/६२)

**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुच:।।**

(१८/६६)

“तरून जाण्यास अत्यंत कठीण, अलौकिक, अती अद्भुत, त्रिगुणात्मक अशी ही माझी योगमाया आहे. परंतु जो पुरुष केवळ मलाच भजतो म्हणजेच मला शरण येतो, तो या मायेचे उल्लंघन करतो अर्थात भवसागर तरून जातो.

हे अर्जुना ! स्त्री, वैश्य आणि शूद्र तसेच पापयोनी - चाण्डाळ वगैरे जे कोणी मला शरण येतात, तेसुद्धा परमगतीच प्राप्त करतात.

केवळ मज सच्चिदानन्दघन वासुदेव परमात्म्यातच अनन्य प्रेमाने नित्य-निरन्तर स्थिर मन ठेव. मज परमेश्वरालाच श्रद्धा-प्रेमसहित निष्काम भावनेने नाम, गुण आणि प्रभावाचे श्रवण, कीर्तन, मनन आणि पठन-पाठनाद्वारा निरन्तर भजणारा हो. तसेच मन, वाणी व शरीराद्वारा सर्वस्व अर्पण करून अतिशय श्रद्धा, भक्ती आणि प्रेमाने विभोर होऊन माझे पूजन करणारा हो आणि सर्वशक्तिमान, विभूती, बल, ऐश्वर्य, माधुर्य, गम्भीरता, उदारता, वात्सल्य आणि सहृयदता वगैरे गुणांनी संपन्न, सर्वांचा आधार अशा वासुदेवाला विनयाने, भक्तिपूर्ण साष्टांग दण्डवत प्रणाम कर. अशा प्रकारे मला शरण आलेला तू आत्म्याला माझ्यात एकरूप करून मला प्राप्त करशील.

हे भारता ! तू सर्व प्रकारे त्या परमेश्वराला शरण जा. त्या परमेश्वराच्या कृपेमुळेच तू परम शान्ती आणि सनातन परम धामाला पावशील.

सर्वधर्म अर्थात संपूर्ण कर्तव्यकर्मे मला अर्पण करून तू केवळ एका सर्वशक्तिमान, सर्वाधार अशा मज परमेश्वराला शरण ये. मी तुला सगळ्या पापांपासून मुक्ती देईन. तू शोक करू नकोस.''

अशा प्रकारे जो पुरुष भगवंताला आत्मनिवेदन करतो, त्याचे सगळे अवगुण, पाप आणि दुःखे यांचा नाश होतो आणि त्याच्या ठिकाणी श्रवण-कीर्तन वगैरे सर्व भक्तींचा विकास होतो. त्याला अत्यानन्द आणि परम शांती मिळते. मग भगवंत त्याच्यापासून कधी दूर होऊ शकत नाही. भगवंताचे सर्व काही त्याचे होते. तो परम पवित्र होतो. त्याच्या दर्शनाने, भाषणाने आणि चिन्तनानेसुद्धा पापात्मे लोक पवित्र होतात. तो तीर्थांसाठी-सुद्धा तीर्थरूप होतो. महाराज परीक्षित श्रीशुकदेवांना म्हणतात -

**सांनिध्यात्ते महायोगिन् पातकानि महान्त्यपि।**
**सद्यो नश्यन्ति वै पुंसां विष्णोरिव सुरेतराः॥**

(श्रीमद्भाग. १/१९/३४)

"जसे भगवान विष्णूच्या केवळ सांनिध्याने लगेच दैत्यांचा नाश होतो, तसेच हे महायोगिन् (शुकदेव) ! आपल्या केवळ सांनिध्याने मोठ-मोठी पापे नष्ट होतात."

धर्मराज युधिष्ठिर श्री विदुरांना म्हणतात -

**भवद्विधा भागवतास्तीर्थभूताः स्वयं विभो।**
**तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि स्वान्तःस्थेन गदाभृता ॥**

**(श्रीमद्भाग. १/१३/१०)**

"भगवन ! आपल्यासारखे भगवद्भक्त स्वतः तीर्थस्वरूप आहेत. ते आपल्या हृदयस्थ भगवंताद्वारा तीर्थांना तीर्थ बनवितात."

प्रचेतागण भगवंतांची स्तुती करताना म्हणतात -

**तेषां विचरतां पद्भ्यां तीर्थानां पावनेच्छया।**
**भीतस्य किं न रोचेत तावकानां समागमः ॥**

**(श्रीमद्भाग. ४/३०/३७)**

"जे तुमचे भक्त तीर्थांना पावन बनविण्यासाठी भूलोकी फिरतात, त्यांचे स्मरण भवसागरात भयभीत झालेल्या कुठल्या माणसाला आवडणार नाही बरे !"

श्रीशुकदेव भगवंतांची स्तुती करताना म्हणतात -

**किरातहूणान्ध्रपुलिन्दपुल्कसा**
**आभीरकङ्का यवनाः खसादयः।**
**येऽन्ये च पापा यदुपाश्रयाश्रयाः**
**शुध्यन्ति तस्मै प्रभविष्णवे नमः ॥**

**(श्रीमद्भाग. २/४/१८)**

"ज्यांच्या आश्रित भक्तांचा आश्रय घेऊन किरात (भिल्ल) हूण, आन्ध्र, कसाई, आभीर, कङ्क, यवन, खस वगैरे दुसरे महापापीसुद्धा शुद्ध होतात, त्या भगवंतांच्या चरणकमलांना नमस्कार असो."

भगवंतांच्या प्रेमाची मूर्तिमान प्रतिमा झालेल्या अशा भक्तांना सगळे

जग परम प्रेममय आणि आनन्दमय प्रतीत होऊ लागते. तो ज्या दिशेने, मार्गाने जातो, तिथे श्रद्धा, प्रेम, भक्ती, आनन्द, समता आणि शांतीचा प्रवाह वाहू लागतो. "अशा भक्तांना धारण करून धरती धन्य आणि सनाथ होते, पितरगण आनंदित होतात आणि देवता नाचू लागतात."

**मोदन्ते पितरो, नृत्यन्ति देवताः, सनाथा चेयं भूर्भवति।**

**(नारदभक्तिसूत्र ७१)**

गोपिका, महाराजा बली, वगैरे हे आत्मनिवेदन-भक्ती करणारे परम भक्त होते.

म्हणून मनुष्यमात्राला मन, वाणी, आणि शरीर सर्व प्रकारे श्रीभगवंताला शरण जाण्यासाठी कटिबद्ध होऊन प्रयत्न करावयास हवा.



# उपसंहार

भगवंताला प्राप्त करण्यासाठी कर्म, योग, ज्ञान सगळे मार्ग उत्तम आहेत, पण भक्तीची शास्त्रात फार प्रशंसा केली गेली आहे. ज्याने नवविधा भक्तीमधून कुठलीही एक भक्ती केली, तो सहजतेने भवसागर पार करून भगवंताला प्राप्त करतो. मग प्रह्लादाप्रमाणे ज्याच्यात सगळ्या भक्तींचा विकास झाला असेल, त्यांच्या बाबतीत विचारूच नका. यापूर्वी नवविधा भक्तीच्या वर्णनात ज्या-ज्या भक्तांची उदाहरणे दिली गेली आहेत, त्यांच्यात केवळ एकाच भक्तीचा विकास झाला होता असे नाही. ज्याच्यात ज्या भावाची प्रधानता होती, त्यात त्यांचे नाव दिले आहे. दुसऱ्यांदा नाव न येण्याचे भान ठेवले आहे. खरोखर ते लोक धन्य आहेत, जे भगवंतांच्या भक्तीत आपले मन रमवतात आणि ज्यांच्या कुळात असे भक्त जन्माला येतात ते कुळही धन्य आहे. भगवान शंकर पार्वतीला म्हणतात -

**सो कुल धन्य उमा सुनु जगत पूज्य सुपुनीत।**
**श्रीरघुबीर परायन जेहिं नर उपज बिनीत॥**

"हे पार्वती ! ऐक. जेथे रामभक्तिपरायण विनम्र माणसे जन्म घेतात, ते कुळ धन्य होय. तसेच ते जगाला पूज्य आणि अत्यंत पवित्र होय."

श्रीमद्भागवतात श्रवणादि-भक्तीचा महिमा सांगताना म्हटले आहे-

**शृण्वन्ति गायन्ति गृणन्त्यभीक्ष्णशः**
**स्मरन्ति नन्दन्ति तवेहितं जनाः।**
**त एव पश्यन्त्यचिरेण तावकं**
**भवप्रवाहोपरमं पदाम्बुजम्॥**

(१/८/३६)

**यत्कीर्तनं यत्स्मरणं यदीक्षणं**
**यद्वन्दनं यच्छ्रवणं यदर्हणम्।**
**लोकस्य सद्यो विधुनोति कल्मषं**
**तस्मै सुभद्रश्रवसे नमो नमः॥**

(२।४।१५)

"जे लोक वारंवार तुमच्या चरित्राचे श्रवण, गायन, वर्णन आणि स्मरण करतात, त्यामुळे आनन्दविभोर होतात, ते लौकरच संसार प्रवाह शांत करणाऱ्या आपल्या चरणकमलांचे दर्शन करतात.

ज्यांचे कीर्तन, स्मरण, दर्शन, वन्दन, श्रवण आणि पूजन लोकांची सगळी पापे धुऊन टाकतात, त्या कल्याणकारी कीर्तिमान भगवंताला वारंवार नमस्कार असो."

देवराज इन्द्र म्हणतात -

**यस्य भक्तिर्भगवति हरौ निःश्रेयसेश्वरे।**
**विक्रीडतोऽमृताम्भोधौ किं क्षुद्रैः खातकोदकैः॥**

(श्रीमद्भाग. ६/१२/२२)

"परम कल्याणाचे स्वामी अशा भगवान श्रीकृष्णांच्या ठायी ज्यांचे प्रेम आहे, ते तर अमृताच्या समुद्रात क्रीडा करीत आहेत. त्यांना तुच्छ विषयरूप डबक्यातील पाण्याची काय जरूर?"

भगवंत स्वत: आपल्या तरण-तारिणी भक्तीची प्रशंसा करताना उद्धवाला म्हणतात -

**न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव।**
**न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथा भक्तिर्ममोर्जिता॥**

**भक्त्याहमेकया ग्राह्य: श्रद्धयाऽऽत्मा प्रिय: सताम्।**
**भक्ति: पुनाति मन्निष्ठा श्वपाकानपि सम्भवात्॥**

**धर्म: सत्यदयोपेतो विद्या वा तपसान्विता।**
**मद्भक्त्यापेतमात्मानं न सम्यक् प्रपुनाति हि॥**

**वाग्गद्‌गदा द्रवते यस्य चित्तं**
**रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च।**
**विलज्ज उद्‌गायति नृत्यते च**
**मद्भक्तियुक्तो भुवनं पुनाति॥**

**(श्रीमद्भाग.११/१४/२०,२१,२२,२४)**

"हे उद्धवा ! मी जितका अनन्य भक्तीने प्रसन्न होतो, तितका योग, सांख्य, धर्म, स्वाध्याय, तपश्चर्या, त्याग वगैरेंनी प्रसन्न होत नाही. संतांचा परमप्रिय आत्मारूप मी एकमात्र श्रद्धा-भक्तीने प्रसन्न होतो. जन्मजात चाण्डाळालाही माझी भक्ती पवित्र करते. माझ्या भक्तिरहित जीवाला सत्य आणि दया वगैरेंनी युक्त धर्म आणि तपस्यायुक्त विद्यासुद्धा संपूर्णतया पवित्र करू शकत नाही."

ज्याची वाणी माझे नाम, गुण आणि लीलेचे वर्णन करता करता गहिवरून जाते, ज्याचे चित्त माझे रूप, गुण, प्रभाव आणि लीलांची आठवण येताच पाझरते, जो पुन्हा पुन्हा अश्रुपात करतो आणि कधी कधी हसू लागतो, तसेच जो लाजलज्जा सोडून प्रेमरसात न्हाऊन वेड्यासारखा मोठ्याने गातो आणि नाचू लागतो, असा माझा भक्त जगाला पवित्र करतो."

भगवंत गीतेत अर्जुनाला म्हणतात -

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया।**
**शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा॥**
**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप॥**

(११/५३-५४)

'ज्याप्रकारे तू मला पाहिले आहेस, त्याप्रमाणे चतुर्भुज रूपातला मी वेदांनी, तपांनी, दानांनी किंवा यज्ञांनीसुद्धा दिसू शकत नाही. परंतु हे परन्तप अर्जुना ! अनन्य भक्तीने अशा चतुर्भुज स्वरूपातील मी प्रत्यक्ष दिसणे, मला तत्त्वत: जाणणे आणि माझ्यात प्रवेश करणे अर्थात माझ्याशी एकात्मभाव प्राप्त होणे शक्य आहे.'

भक्त श्रीकाकभुशुण्डी म्हणतात -

**राम भगति चिंतामनि सुंदर। बसइ गरुड़ जाके उर अंतर॥**
**परम प्रकास रूप दिन राती। नहिं कछु चहिअ दिआ घृत बाती॥**
**मोह दरिद्र निकट नहिं आवा। लोभ बात नहिं ताहि बुझावा॥**
**प्रबल अबिद्या तम मिटि जाई। हारहिं सकल सलभ समुदाई॥**
**खल कामादि निकट नहिं जाहीं। बसइ भगति जाके उर माहीं॥**
**गरल सुधासम अरि हित होई। तेहि मनि बिनु सुख पाव न कोई॥**
**ब्यापहिं मानस रोग न भारी। जिन्ह के बस सब जीव दुखारी॥**
**राम भगति मनि उर बस जाकें। दुख लवलेस न सपनेहुँ ताकें॥**
**चतुर सिरोमनि तेइ जग माहीं। जे मनि लागि सुजतन कराहीं॥**

हे गरुडा ! ज्याच्या अंत:करणात रामभक्तिरूप सुंदर चिन्तामणी असेल, त्याला रात्रंदिवस परम प्रकाश दिसत असतो. त्याला तूप-वातीच्या दिव्याची काहीही आवश्यकता नाही. त्याच्याजवळ मोहरूप दारिद्र्य येत नाही. लोभरूप वारा त्याला विझवू शकत नाही. त्यामुळे प्रबळ अविद्यारूप अंधार नाहीसा होतो. मदादी पतंगांचा सारा समूह जळून जातो. ज्याच्या हृदयात भक्ती असते, त्याच्या जवळपासही काम,

क्रोध, लोभ हे दुष्ट फिरकत नाहीत. त्याला विष अमृत होते आणि शत्रू मित्र होतात. त्या चिन्तामणीशिवाय कुणालाच सुख लाभत नाही. ज्या मोठमोठ्या मानसरोगांनी सर्व जीव दुःखी होतात, ते या भक्तांना होत नाहीत. ज्याच्या मनात रामभक्तिरूप मणी असेल, त्याला स्वप्नातही दुःखाचा लवलेश बाधत नाही. जे या मण्यासाठी प्रयत्न करतात, तेच सर्व मनुष्यांत चतुरशिरोमणी समजावेत.

म्हणून सर्वांनी वरील सर्व प्रकारांनी भगवंतांच्या भक्तीचा आश्रय घेऊन जीवनाचे आणि जन्माचे सार्थक करावयास हवे.



॥ श्रीहरिः ॥

# भरतामध्ये नवविधा भक्ती

श्रीमद्भागवतात वर्णन केलेल्या नवविधा भक्तीचा आदर्श भक्त प्रह्लाद होता जेव्हा हिरण्यकश्यपूने सांगितले की, तू गुरूपाशी आतापर्यन्त जे काही शिकलास त्यामधील तुला सर्वश्रेष्ठ वाटणारी गोष्ट ऐकव. तेव्हा प्रह्लाद म्हणाला

**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्।**
**अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्॥**
**इति पुंसार्पिता विष्णौ भक्तिश्चेन्नवलक्षणा।**
**क्रियते भगवत्यद्धा तन्मन्येऽधीतमुत्तमम्॥**

(श्रीमद्भाग. ७/५/२३-२४)

"भगवान श्रीविष्णूचे नाव, रूप, गुण आणि प्रभाव वगैरेंचे श्रवण, कीर्तन, स्मरण, भगवंतांची चरणसेवा, पूजन, वंदन, भगवंतांचे दास्य, सखाभाव आणि स्वतःला समर्पण (आत्मसमर्पण) करण्याचा भाव ही नवविधा भक्ती आहे. जर मनुष्याने भगवान विष्णूंची नवविधा भक्ती केली, तर मी त्याला नक्कीच उत्तम अध्ययन समजतो."

भक्त प्रह्लादाने सांगितलेल्या नवविधा भक्तीचे हे सगळे प्रकार अत्यंत प्रेमळ आणि अनन्य भक्त भरतामध्ये पहावयास मिळतात. भरत सदाचार-सद्गुणसंपन्न, ज्ञानी, विरागी, त्यागी आणि भगवंतांचा अनन्य, विशुध्द, निष्काम प्रेमळ भक्त होता. तुलसीदासांनी आपल्या रामचरितमानसात जागोजागी मुक्त कंठाने त्याची स्तुती केली आहे. रामचरितमानसात जिथेजिथे भरताचे चरित्र आले आहे, ते वाचताना वाचक थोडा जरी सहृदय असेल, तर त्याचे हृदय गद्गदून जाते आणि अश्रुपात होऊ लागतो.

भरताचा महिमा गाताना तुलसीदासांनी स्वत: म्हटले आहे -

**भरत प्रेमु तेहि समय जस तस कहि सकइ न सेषु।**
**कबिहि अगम जिमि ब्रह्मसुखु अह मम मलिन जनेषु॥**

"भरताच्या त्यावेळच्या प्रेमाचे शेषसुध्दा वर्णन करू शकणार नाही. कवींना तर ते इतके अगम्य होते की, अहंता-ममता इ. दोषांनी युक्त असणाऱ्या माणसांना ब्रह्मानंद अगम्य असतो."

**भरत प्रीति नति बिनय बड़ाई।सुनत सुखद बरनत कठिनाई॥**
**भरत रहनि समुझनि करतूती।भगति बिरति गुन बिमल बिभूती॥**
**बरनत सकल सुकबि सकुचाहीं।सेस गनेस गिरा गमु नाहीं॥**

"भरताची राहणी, ज्ञान, कृती, भक्ती, वैराग्य, निर्मळ गुण आणि ऐश्वर्याचे वर्णन करायला सर्व कवी संकोचतात. कारण त्यांचे वर्णन स्वत: शेष, गणेश किंवा सरस्वतीलाही करता येण्याजोगे नाही."

**सिय राम प्रेम पियूष पूरन होत जनमु न भरत को।**
**मुनि मन अगम जम नियम सम दम बिषम ब्रत आचरत को॥**
**दुख दाह दारिद दंभ दूषन सुजस मिस अपहरत को।**
**कलिकाल तुलसी से सठन्हि हठि राम सनमुख करत को॥**

"श्री सीतारामांच्या प्रेमरूप अमृताने भरलेल्या भरताचा जर जन्म झाला नसता, तर मुनींच्या मनातील आगम, यम, नियम, शम, दम,आदी कठीण व्रतांचे आचरण कोणी केले असते ? दु:ख, संताप, दारिद्र्य,

ढोंग आदी दोष आपल्या सुयशाने कोणी हरण केले असते ? तसेच कलियुगात तुलसीदासासारख्या अभक्तांना जबरदस्तीने श्रीरामासन्मुख कोणी केले असते?''

जनक तर भरताचे चरित्र, गुण, भक्ती आणि प्रेमभाव पाहून मुग्ध झाले. चित्रकूटावर ते आपली पत्नी सुनयनेस म्हणतात-

**सावधान सुनु सुमुखि सुलोचनि। भरत कथा भव बंध बिमोचनि॥**
**धरम राजनय ब्रह्मबिचारू। इहाँ जथामति मोर प्रचारू॥**
**सो मति मोरि भरत महिमाही। कहै काह छलि छुअति न छाँही॥**
**बिधि गनपति अहिपति सिव सारद। कबि कोबिद बुध बुद्धि बिसारद॥**
**भरत चरित कीरति करतूती। धरम सील गुन बिमल बिभूती॥**
**समुझत सुनत सुखद सब काहू। सुचि सुरसरि रुचि निदर सुधाहू॥**

''हे सुंदर सुनयने ! लक्ष देऊन ऐक. भरताची कथा संसारबंधनातून मुक्त करणारी आहे. धर्म, राजनीती आणि ब्रह्मज्ञान या तिन्ही विषयांत मला थोडेबहुत ज्ञान आहे. वरील विषय जाणणारीही माझी बुध्दी भरताच्या महिम्याचे वर्णन करणे तर सोडाच; पण त्याच्या सावलीलाही उभी राहू शकणार नाही. ब्रह्मदेव, गणपती, शेष, महादेव, सरस्वती, कवी, पंडित, ज्ञानी, बुध्दिमान, अशा सर्वांना भरताचे चरित्र, कीर्ती, करणी, धर्म, शील, गुण आणि निर्मळ ऐश्वर्य समजून घेण्यास आणि ऐकण्यास सुख देणारे आहेत. तसेच पावित्र्याच्या बाबतीत गंगेला आणि चवीच्या बाबतीत अमृतालाही तुच्छ ठरवणारे आहेत.''

**भरत अमित महिमा सुनु रानी। जानहिं रामु न सकहिं बखानी॥**

''हे राणी, ऐक. भरताचा अवर्णनीय महिमा एक श्रीरामचंद्रच जाणतात. पण तेही त्याचे वर्णन करू शकत नाहीत.''

**देबि परंतु भरत रघुबर की। प्रीति प्रतीति जाइ नहिं तरकी॥**
**भरतु अवधि सनेह ममता की। जद्यपि रामु सीम समता की॥**

**परमारथ स्वारथ सुख सारे। भरत न सपनेहुँ मनहुँ निहारे।।**
**साधन सिद्धि राम पग नेहू। मोहि लखि परत भरत मत एहू।।**

"परंतु हे देवी ! भरत आणि श्रीराम यांचे एकमेकांवरील प्रेम आणि विश्वास विचारांच्या मर्यादेपलीकडचा आहे. जरी श्रीरामचन्द्र समतेची सीमा असले, तरी भरत प्रेम आणि ममतेची मर्यादा आहेत. भरताने सर्व परमार्थ, स्वार्थ आणि सुख यांच्याकडे स्वप्नातही मनानेसुध्दा ढुंकून पाहिले नाही. श्रीरामांच्या चरणांवरील प्रेमच त्याचे साधन व तीच त्याची सिद्धी. मला तर भरताचा हाच एकमात्र सिद्धान्त आहे, असे वाटते."

भरत प्रेममय भक्तीचा अगाध सागर होता. किंवा असे म्हणू या की, तो साक्षात प्रेममूर्तीच होता. जिथेजिथे भरताचे चरित्र बघू, तिथेतिथे प्रेमसमुद्राच्या लाटा दिसतात. त्याशिवाय तो सद्गुण आणि सदाचारात अद्वितीय होता. त्याचे गुण, चरित्र, स्वभाव आणि प्रेम पाहून श्रीराम मुग्ध झाले. ते म्हणतात -

**तात भरत तुम्ह धरम धुरीना। लोक बेद बिद प्रेम प्रबीना।।**
**करम बचन मानस बिमल तुम्ह समान तुम्ह तात।**
**गुर समाज लघु बंधु गुन कुसमयँ किमि कहि जात।।**

भरताचा महिमा कुठवर वर्णावा? रामायणात त्याचा महिमा सर्वत्र विखुरला आहे. इथे केवळ उदाहरण दिले आहे. ग्रंथ वाढू नये, म्हणून जास्त उदाहरणे उद्धृत केली नाहीत.

आता भक्तीचे नऊ प्रकार भरताच्या जीवनचरित्रात कसे आहेत, त्याचे वर्णन महाभारत, रामचरितमानस, पद्मपुराण, वाल्मीकिरामायण, अध्यात्मरामायण वगैरे ग्रंथांच्या आधारे केले आहे.



# श्रवण

भगवंतांच्या प्रेमळ भक्तांद्वारा कथित भगवंताचे नाव, रूप, गुण, प्रभाव, लीला, तत्त्व आणि रहस्याने पूर्ण अमृतासमान कथांचे श्रध्देने आणि प्रेमाने श्रवण करणे आणि त्या अमृतासमान गोष्टींचे श्रवण करून प्रेममुग्ध होणे हे श्रवणभक्तीचे स्वरूप आहे.

ही लक्षणे भरतात प्रत्यक्ष दिसतात. श्री रामचन्द्रांचे गुण, चरित्र, प्रेम आणि प्रभाव ऐकून भरत मुग्ध होत असे. ज्यावेळी हनुमंत रामचंद्रांचा विजयसंदेश ऐकविण्यासाठी भरताकडे नन्दिग्रामात गेले, तेव्हा हनुमंताच्या तोंडून ही शुभवार्ता ऐकताच भरताची दशा अद्भुत झाली.

त्या अवस्थेचे वर्णन करताना तुलसीदासजी म्हणतात-

**सुनत बचन बिसरे सब दूखा। तृषावंत जिमि पाइ पियूषा॥**
**मिलत प्रेम नहि हृदयँ समाता। नयन स्रवत जल पुलकित गाता॥**
**कपि तव दरस सकल दुख बीते। मिले आजु मोहि राम पिरीते॥**
**बार बार बूझी कुसलाता। तो कहुँ देउँ काह सुनु भ्राता॥**
**एहि संदेस सरिस जग माहीं। करि बिचार देखेउँ कछु नाहीं॥**
**नाहिन तात उरिन मैं तोही। अब प्रभु चरित सुनावहु मोही॥**
**तब हनुमंत नाइ पद माथा। कहे सकल रघुपति गुन गाथा॥**

श्रीहनुमंताकडून ही वार्ता ऐकताच भरत सर्व दुःख विसरला. तहानलेल्याला अमृत मिळावे, तशी त्याची स्थिती झाली. प्रेम त्याच्या हृदयात मावेना. त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागले. अंग रोमांचित झाले. हे कपिराजा ! तुझ्या दर्शनाने माझे सर्व दुःख संपले. आज मला तुझ्या रूपाने प्रिय रामचंद्रच भेटले. भरताने वारंवार कुशल विचारले आणि म्हटले, बंधो ! ऐक. मी तुला या बदल्यात काय देऊ ? विचार करता या निरोपासारखा जगात दुसरा श्रेष्ठ (देण्यालायक) पदार्थच नाही. बाबा रे ! मी कोणत्याही रीतीने तुझ्या ऋणातून मुक्त होऊ शकत नाही.

आता मला प्रभूंचे चरित्र ऐकव. तेव्हा हनुमंताने भरताच्या पायांवर मस्तक लववून श्रीरामचंद्रांची सर्व गुणगाथा ऐकवली.

वाल्मीकि रामायणात भरत हनुमंताला म्हणतो -

**बहूनि नाम वर्षाणि गतस्य सुमहद्वनम्।**
**शृणोम्यहं प्रीतिकरं मम नाथस्य कीर्तनम्॥**

(युद्ध. १२६।१)

"भगवान रामचंद्रांना त्या महान वनात गेल्याला खूप वर्षे लोटली. पण त्यानंतर आजच मी माझ्या स्वामींचा प्रीतिकारक संदेश (वार्ता) ऐकत आहे."

असाच श्लोक थोड्या फरकाने अध्यात्मरामायणातही दिसतो. तिथे म्हटले आहे -

**एवमुक्तोऽथ हनुमान् भरतेन महात्मना॥**
**आचचक्षेऽथ रामस्य चरितं कृत्स्नशः क्रमात्।**
**श्रुत्वा तु परमानन्दं भरतो मारुतात्मजात्॥**

( युद्ध. १४।६५-६६ )

"त्यानंतर भरताचे असे बोलणे ऐकून हनुमंताने श्रीरामांचे संपूर्ण चरित्र ऐकविले. वायुपुत्र हनुमंताने सांगितलेले चरित्र ऐकून भरताला अत्यानंद झाला."

त्यावेळी भरताची जी अवस्था झाली, त्याचे वर्णन करताना महर्षी वाल्मीकी म्हणतात -

**ततः स वाक्यैर्मधुरैर्हनूमतो निशम्य हृष्टो भरतः कृताञ्जलिः।**
**उवाच वाणीं मनसः प्रहर्षिणीं चिरस्य पूर्णः खलु मे मनोरथः॥**

(वा.रा.युद्ध. १२६।५५)

"त्यानंतर हनुमंताचे ते मधुर बोलणे ऐकून भरताला फार आनंद झाला. तो हात जोडून अतिशय आनंदाने म्हणाला, अहाहा ! आज माझे कित्येक दिवसांचे मनोरथ पूर्ण झाले."

श्रीरामांचा राज्याभिषेक झाल्यानंतर सगळे भाऊ अयोध्येत सुखाने

राहू लागले, त्या वेळी जेव्हा केव्हा भरत आणि शत्रुघ्न हनुमंताबरोबर उपवनात जात, तेव्हा हनुमंताकडून श्रीरामाचे गुणवर्णन ऐकत. ते वर्णन ऐकून, त्या गोष्टी ऐकून त्यांच्यात अत्यंत अनुराग उत्पन्न होई आणि त्यायोगे आह्लाद, मुग्धता वगैरे प्रत्यक्ष प्रगट होई. तुलसीदास म्हणतात -

**भरत सत्रुहन दोनउ भाई । सहित पवनसुत उपबन जाई ॥**
**बूझहिं बैठि राम गुन गाहा । कह हनुमान सुमति अवगाहा ॥**
**सुनत बिमल गुन अति सुख पावहिं । बहुरि बहुरि करि बिनय कहावहिं ॥**

"भरत आणि शत्रुघ्न दोन्ही भाऊ हनुमंतासह उपवनात जायचे. तेथे बसून श्रीरामांची गुणगाथा हनुमंतांना विचारायचे आणि हनुमंत आपल्या सुंदर बुध्दीने ती कथा रंगवून सांगायचे. श्रीरामांचे निर्मल गुण ऐकून ते अतिशय आनंदित व्हायचे. इतकेच नव्हे, तर विनयपूर्वक पुन्हा पुन्हा सांगायला लावायचे."



## कीर्तन

भगवंताचे नाव, रूप, गुण, प्रभाव, चरित्र, तत्त्व, आणि रहस्याचा श्रध्दायुक्त प्रेमाने उच्चार करीत करीत शरीरावर रोमांच उभे राहणे, कंठ दाटून येणे, अश्रुपात, हृदय प्रसन्न होणे, मुग्धता (मुग्धावस्था) वगैरे कीर्तन भक्तीचे स्वरूप आहे.

ही लक्षणे भरतात दिसतात. ज्यावेळी भरत श्रृङ्गवेरपुरीला गेल्यावर गंगाकिनारी गेला, तिथे त्याच्यापाशी नावाडी आला. तेव्हा त्याने -

**दृष्ट्वा भरतमासीनं सानुजं सह मन्त्रिभिः ।**
**चीराम्बरं घनश्यामं जटामुकुटधारिणम् ॥**
**राममेवानुशोचन्तं रामरामेति वादिनम् ।**
**ननाम शिरसा भूमौ गुहोऽहमिति चाब्रवीत् ॥**

**(अध्यात्म. अयोध्या. ८।२०-२१)**

“घननीळ, शरीरधारी, वस्त्रभूषित, जटामुकुटधारी, श्रीरामाचे स्मरण-चिन्तन करीत ‘राम राम’ असा जप करीत मंत्र्यांबरोबर आणि आपल्या लहान भावाबरोबर-शत्रुघ्नाबरोबर बसलेल्या भरताला पाहून नावाड्याने भूमीवर मस्तक ठेवून प्रणाम केला आणि म्हटले की, मी नावाडी गुह आहे.

त्यानंतर भरत प्रयागला गेला. तिथेसुध्दा भजन कीर्तन करीत गेला. गोस्वामी तुलसीदास म्हणतात -

**भरत तीसरे पहर कहँ कीन्ह प्रबेसु प्रयाग।**
**कहत राम सिय राम सिय उमगि उमगि अनुराग॥**

“प्रेमाचे भरते येऊन ‘सीताराम, सीताराम’ म्हणत भरताने तिसऱ्या प्रहरी प्रयागात प्रवेश केला.

ज्यावेळी भगवंतांच्या विरहात व्याकूळ होऊन भरत नन्दिग्रामात राहात होता, त्यावेळी तो मुनीप्रमाणे आपला वेळ घालवत असे. तिथे प्रेममुग्ध अवस्थेत भगवंतांचा नामजप आणि त्यांच्या गुणचरित्राच्या अमृता-समान रसाळ कथांचे वर्णन करी. रामचरितमानसात लिहिले आहे -

**पुलक गात हियँ सिय रघुबीरू। जीह नामु जप लोचन नीरू॥**

“भरताच्या अंगावर रोमांच आहेत. हृदयात सीताराम आहेत. जिभेवर नामजप आहे आणि डोळ्यांत पाणी आहे.”

पद्मपुराणाच्या पातालखंडातही आहे की -

**गर्तशायी ब्रह्मचारी जटावल्कलसंयुतः।**
**कृशाङ्गयष्टिर्दुःखार्तः कुर्वन् रामकथां मुहुः॥**

“त्यावेळी भरत जमिनीत खड्डा खणून त्यात झोपे. ब्रह्मचर्याचे पालन करून मस्तकावर जटा आणि शरीरावर वल्कल धारण करी. त्याचे शरीर अत्यंत कृश झाले होते. तो सतत श्रीरामचंद्रांच्या कथा सांगून विरहाने व्याकुळ होई.”

तिथे नन्दिग्रामात जेव्हा भरतापाशी हनुमंत गेला, तेव्हा त्याने पाहिले -

**कथयन्तं मन्त्रिवृद्धान् रामचन्द्रकथानकम्।**
**तदीयपदपाथोजमकरन्दसुनिर्भरम् ॥**

(पद्म. पाताल. २।१२)

"भरत आपल्या वृध्द मंत्र्यांना श्रीरामचंद्रांच्या कथा सांगत होता. ज्या त्यांच्या चरणकमलातील मकरंदरसासारख्या रसाळ आणि गोड होत्या."

त्यावेळी तपश्चर्येमुळे अत्यंत कृश झालेल्या विरक्त भरताला श्रीरामचन्द्रांच्या विरहाने व्याकूळ होऊन भगवंतांचे नामस्मरण करताना पाहून हनुमंताला अत्यानंद झाला. तेव्हा हनुमंताची जी अवस्था झाली, तिचे वर्णन गोस्वामी तुलसीदासांच्या शब्दातच वाचा -

**बैठे देखि कुसासन जटा मुकुट कृस गात।**
**राम राम रघुपति जपत स्रवत नयन जलजात॥**

**देखत हनूमान अति हरषेउ। पुलक गात लोचन जल बरषेउ॥**
**मन महँ बहुत भाँति सुख मानी। बोलेउ श्रवन सुधा सम बानी॥**
**जासु बिरहँ सोचहु दिन राती। रटहु निरंतर गुन गन पाँती॥**
**रघुकुल तिलक सुजन सुखदाता। आयउ कुसल देव मुनि त्राता॥**

"हनुमंताने भरताला पाहिले. त्याने जटाजूट बांधला होता. त्याचे शरीर कृश झाले होते. मुखाने रामनामाचा जप चालला होता. नेत्रकमलांतून अश्रुप्रवाह चालू होता. त्याला पाहताच हनुमान अतिशय आनंदित झाला. त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. डोळयातून आनंदाश्रू वाहू लागले. मन अपरिमित सुखाने भरून गेले आणि कानांना अमृतासमान वाटणारी वाणी तो बोलू लागला. ज्यांच्या विरहाने आपण रात्रंदिवस चिंताग्रस्त होता, ज्यांचे गुणगान आपण निरंतर करीत आहात, ते सज्जनांना सुख देणारे, मुनींचे रक्षण करणारे रघुकुलतिलक प्रभू रामचंद्र सकुशल आले आहेत."

अशा प्रकारे भरताचे भगवंताचे नामस्मरण, गुणानुवादन, कीर्तन वगैरेंचे सुंदर वर्णन सापडते. आम्हीसुध्दा भरतासारख्या प्रेमळ-भक्ताप्रमाणे भगवंताच्या ठिकाणी प्रेममग्न होऊन जप आणि कथा-कीर्तन करावयास हवे.



# स्मरण

भगवंताचे नाम, रूप, गुण, प्रभाव, लीला, तत्त्व आणि रहस्याचे प्रेममग्न होऊन मनन करावे आणि असे मनन करीत करीत भगवंताच्या स्वरूपात तल्लीन होऊन जाणे, हे स्मरण भक्तीचे स्वरूप आहे. भरतामध्ये हेही लक्षण दिसते. भगवान श्रीरामांचे सतत चिन्तन करणे, हा तर त्याचा स्वभावच होता. तो नेहमी सर्वगुणसंपन्न भगवान श्रीरामांच्या अद्भुत रूपलावण्ययुक्त स्वरूपाचे विशेष रूपाने चिन्तन करी. तो अयोध्येत असताना चिन्तन करीच; पण जेव्हा भगवंतांना अयोध्येस परत आणण्यासाठी चित्रकूटावर गेला, तेव्हा जाताना रस्त्यातही भगवंतांचे चिन्तन करीत होता आणि चित्रकूटावर तर त्याने प्रत्यक्ष श्रीरामचन्द्रांचे दर्शन घेतले. नंतर जेव्हा तो अयोध्येस परतला, तेव्हासुध्दा रस्त्यात श्रीरामचन्द्रांचे गुण, चरित्र आणि स्वरूपाचे मनन करीत होता. मग नन्दिग्रामात येऊन त्याने आपला जास्तीत जास्त वेळ चिन्तनात घालविला.

अध्यात्मरामायणात भरताच्या अयोध्या-निवासकाळाचे वर्णन करताना लिहिले आहे -

**अवसत्स्वगृहे तत्र राममेवानुचिन्तयन्।**
**वसिष्ठेन सह भ्रात्रा मन्त्रिभिः परिवारितः॥**

**(अयोध्या. ७।११३)**

"तिथे अयोध्येत आपल्या घरी गुरू वसिष्ठ आणि बन्धू शत्रुघ्ना-सोबत मंत्र्यांनी वेढलेला भरत श्रीरामचन्द्रांचे स्मरण करत राहू लागला."

चित्रकूटाच्या मार्गात भरताच्या अवस्थेचे वर्णन करताना म्हटले आहे -

**इत्यद्भुतप्रेमरसाप्लुताशयो विगाढचेता रघुनाथभावने।**
**आनन्दजाश्रुस्नपितस्तनान्तरः शनैरवापाश्रमसन्निधिं हरेः॥**

**(अध्यात्म. अयोध्या. ९।४)**

" ज्याचे हृदय अशाप्रकारे अद्भुत प्रेमरसाने भरलेले आहे, मन श्रीरामचन्द्रमय झाले आहे आणि वक्ष:स्थळ प्रेमाश्रूंनी भिजलेले आहे, असा भरत हळू हळू श्रीहरीच्या आश्रमाजवळ पोचला."-

**भरतस्तु सहामात्यैर्मातृभिर्गुरुणा सह।**
**अयोध्यामगमच्छीघ्रं राममेवानुचिन्तयन्॥**

**(अध्यात्म. अयोध्या. ९।६९-७०)**

"भरत आपले मंत्री, माता आणि गुरू वसिष्ठांसोबत श्रीरामचन्द्रांचे चिन्तन करीत शीघ्रगतीने अयोध्येला परतला."

तुलसीदास म्हणतात -

**मुनि महिसुर गुर भरत भुआलू। राम बिरहँ सबु साजु बिहालू॥**
**प्रभु गुन ग्राम गनत मन माहीं। सब चुपचाप चले मग जाहीं॥**

"मुनी, ब्राह्मण, गुरुजन, भरत आणि जनकराजा असा सारा समाज रामविरहाने व्याकूळ झाला होता. प्रभूच्या गुणांचे मनात स्मरण करीत सर्वजण चुपचाप चालले आहेत."

नन्दिग्रामात निवास करणारा भरत आपल्या मंत्र्यांना म्हणतो-

**दुर्भगस्य मम प्राप्तं स्वाघमार्जनमादरात्।**
**करोमि रामचन्द्राङ्घ्रिं स्मारं स्मारं सुमन्त्रिणः॥**

**(पद्म. पाताल. १।४०)**

"मन्त्रिवर ! मज अभाग्याला आपल्या पापांचे प्रायश्चित्त करण्यासाठी ही संधी मिळाली आहे. म्हणून मी श्रीरामचंद्रांच्या चरणांचे निरंतर आदराने स्मरण करून आपल्या दोषांचे परिमार्जन करीन."

"त्यावेळी हनुमंताने -

**ददर्श भरतं दीनं कृशमाश्रमवासिनम्।।**
**मलपङ्कविदिग्धाङ्गं जटिलं वल्कलाम्बरम्।**
**फलमूलकृताहारं रामचिन्तापरायणम्।।**
**यं त्वं चिन्तयसे रामं तापसं दण्डके स्थितम्।**
**अनुशोचसि काकुत्स्थः स त्वां कुशलमब्रवीत्।।**

**( अध्यात्म. युद्ध. १४।५१,५२,५५ )**

अती दीन-दुर्बळ अवस्थेत आश्रमात राहून अत्यंत मलिन शरीराच्या, जटाजूट आणि वल्कलधारी, तसेच फळे-मुळे वगैरे खाऊन भगवान श्रीरामचन्द्रांच्या ध्यानात मग्न असलेल्या भरताला पाहिले आणि म्हटले - भरता ! आपण ज्या दण्डकारण्यवासी तपोनिष्ठ भगवान श्रीरामचन्द्रांचे चिन्तन करता, ज्यांच्यासाठी इतके आकुळ-व्याकूळ आहात, त्या ककुत्स्थनन्दन श्रीरामाने आपले क्षेम-कुशल सांगितले आहे."

इकडे भरत वेळोवेळी भगवंतांचे गुण, चरित्र आणि प्रभावाने युक्त स्वरूपाची आठवण करीत विरह-व्याकूळ अवस्थेत, मुग्धावस्थेत होता. पण त्याचा भगवंतावर अढळ विश्वास होता की, ते मला नक्की भेटतील. आणि या आशेवर तो क्षणोक्षणी भगवंतांची वाट बघत असे. त्याला भगवंतांच्या दर्शनासाठीचा विलम्ब असह्य होत होता. म्हणून विरह-व्याकुळतेत मग्न होऊन तो मनातल्या मनात करुणाभावाने विलाप करत होता. याविषयी तुलसीदासाने त्याच्या विलापाचे सुंदर चित्रण केले आहे. ते म्हणतात -

**भरत नयन भुज दच्छिन फरकत बारहिं बार।**
**जानि सगुन मन हरष अति लागे करन बिचार।।**

**रहेउ एक दिन अवधि अधारा। समुझत मन दुख भयउ अपारा।।**
**कारन कवन नाथ नहिं आयउ। जानि कुटिल किधौं मोहि बिसरायउ।।**
**अहह धन्य लछिमन बड़भागी। राम पदारबिंदु अनुरागी।।**
**कपटी कुटिल मोहि प्रभु चीन्हा। ताते नाथ संग नहिं लीन्हा।।**

**जौं करनी समुझै प्रभु मोरी। नहिं निस्तार कलप सत कोरी॥**
**जन अवगुन प्रभु मान न काऊ। दीन बंधु अति मृदुल सुभाऊ॥**
**मोरे जियँ भरोस दृढ़ सोई। मिलिहहिं राम सगुन सुभ होई॥**
**बीतें अवधि रहहिं जौं प्राना। अधम कवन जग मोहि समाना॥**

**राम बिरह सागर मँह भरत मगन मन होत।**
**बिप्र रूप धरि पवनसुत आइ गयउ जनु पोत॥**

"भरताचा उजवा नेत्र आणि बाहू वारंवार स्फुरण पावत होता. हा शुभशकुन ओळखून मनात अतिशय आनंदित होऊन तो विचार करू लागला. प्राणांना आधार असणाऱ्या दिवसांपैकी फक्त एकच दिवस शिल्लक राहिला. हा विचार मनात येताच त्याला अतिशय दुःख झाले. 'नाथ आले नाहीत, याचे काय कारण असावे बरे ? मी कपटी आहे, असे वाटून प्रभू मला विसरले तर नसतील ! अहाहा! लक्ष्मण केवढा भाग्यवान ! तो प्रभूंच्या चरणकमळांवर(खरे) प्रेम करतो. (म्हणून तो त्यांच्यापासून वेगळा झाला नाही.) प्रभूंना मी कपटी, कुटिल वाटलो. म्हणूनच त्यांनी मला बरोब र नेले नाही. जर प्रभूंनी माझ्या करणीवर लक्ष दिले, तर शंभर कोटी कल्पांपर्यंत माझी पापांपासून सुटका होणार नाही. पण प्रभू (मज) सेवकाचे अवगुण पाहात नाहीत. ते दीनबंधू असून अतिशय कोमल स्वभावाचे आहेत. म्हणून माझा पक्का विश्वास आहे की, श्रीराम मला अवश्य भेटतील. कारण शुभ शकुन होत आहेत. ठरलेली वेळ संपल्यावरही (जर श्रीराम आले नाहीत आणि) माझे प्राण शिल्लक राहिले, तर जगात माझ्यासारखा नीच कोण असेल बरे !

श्रीरामांच्या विरहसमुद्रात भरताचे मन गटांगळ्या खात होते, इतक्यात पवनपुत्र हनुमान ब्राम्हणरूप धारण करून आला. जणू बुडणाऱ्या भरताला वाचवणारी नावच !"

भगवान श्रीरामचन्द्रांच्या वियोगात त्यांच्या येण्याची आशेने वाट बघत भरत कशा तऱ्हेने श्रीरामाच्या गुणांचे व स्वभावाचे चिन्तन करण्यात आपला काळ व्यतीत करी, हे ध्यानात घेण्यासारखे आहे.



# पाद-सेवन

भगवंतांच्या दिव्य मंगलमय स्वरूपाची धातू वगैरेची मूर्ती, चित्र किंवा मानसमूर्तीच्या मनोहर चरणांचे आणि चरणधुळीचे व चरण-पादुकांचे श्रद्धेने दर्शन, चिन्तन, पूजन, आणि सेवन करीत करीत भगवंतप्रेमात मग्न होऊन जाऊन त्यांचे चरणामृत घेणे, याला 'पादसेवन' म्हणतात.

हेही लक्षण भरतात दिसते. भरत पादसेवन भक्तीचा आचार्य आहे. जरी लक्ष्मण सदैव भगवंतांच्या चरणसेवेत रुजू होता, तरी चरणांप्रमाणेच चरण-पादुकांची सेवा, पूजा करावयाचे शिक्षण भरताकडूनच मिळते. तसेच चरणधुळीचा आदर जसा आणि जितका भरताने केलेला आहे, तसा दुसऱ्या कोणी केल्याचा उल्लेख वाल्मीकिरामायणा-पूर्वीच्या काळात कुठे पाहावयास मिळत नाही.

चित्रकूटाला प्रस्थान करण्याआधीसुद्धा भरताच्या हृदयात श्रीरामचन्द्रांच्या चरणकमलाविषयी जी अनन्य भक्ती,चरणांचे दर्शन आणि सेवन करण्याची जी लालसा विद्यमान होती, ती अलौकिक, अद्वितीय आणि प्रशंसनीय आहे.भरत जेव्हा अयोध्येहून चित्रकूटास गेला, तेव्हा रस्त्यात जिथे कुठे रामचन्द्रांचे चरणरज दिसले, त्यांना आदर-सन्मानाने, श्रद्धेने व प्रेमाने मस्तकी लेवून, डोळ्यांना लावून तो मुग्ध झाला. भरत श्रीरामचन्द्रांची चरणसेवा करण्यासाठीच त्यांना चित्रकूटाहून अयोध्येस परतण्याचा आग्रह करीत होता. पण भगवंतांनी कुठल्याही प्रकारे अयोध्येस परतण्याचे मान्य केले नाही. तेव्हा त्यांच्या चरण-सेवेचे अंगरूप त्यांच्या चरण-पादुका देण्याविषयी त्याने प्रार्थना केली. एवढेच नाही, तर भगवंतांनी दिलेल्या चरणपादुका आपल्या मस्तकावर धारण करून त्यांनाच आपल्या वियोगकाळचा आधार मानून चित्रकूटाहून परतताना वाटेत चरणपादुकांचे चिंतन करीत करीत नन्दिग्रामास आला. नंतर पादुकांना राजसिंहासनावर स्थापन करून राज्याचे सारे काम पादुकांना निवेदन

करून तो चरणपादुकांनाच आपला जीवनाधार समजून श्रद्धायुक्त प्रेमाने त्यांचे पूजन करी. वाल्मीकीय आणि अध्यात्म रामायणात म्हटले आहे की, जेव्हा श्रीरामचन्द्र अयोध्येस परतले तेव्हा भरत श्रीरामचन्द्रांच्या चरण-पादुका मस्तकावर धारण करूनच त्यांना सामोरा गेला. खरोखर भरताची चरण-सेवा-भक्ती धन्य आहे. भरत म्हणतो -

**यावन्न चरणौ भ्रातुः पार्थिवव्यञ्जनान्वितौ।**
**शिरसा प्रग्रहीष्यामि न मे शान्तिर्भविष्यति॥**

(वा. रा. अयोध्या.९८।९)

"जो पर्यन्त मी राजोपयोगी चिह्नांनी युक्त अशा माझ्या बंधूंच्या चरणांना मस्तकाने प्रणाम करणार नाही, तोपर्यन्त माझ्या जीवाला शांती मिळणार नाही."

रामचरितमानसात लिहिले आहे -

**चरन रेख रज आँखिन्ह लाई। बनइ न कहत प्रीति अधिकाई॥**

"भरताने रामचरणांच्या खुणांची धूळ डोळ्यांना लावली. त्यावेळच्या भरताच्या प्रेमाचे वर्णन करणे शक्य नाही."

तसेच -

**हरषहिं निरखि राम पद अंका। मानहुँ पारसु पायउ रंका॥**
**रज सिर धरि हियँ नयनन्हिं लावहि। रघुबर मिलन सरिस सुख पावहिं॥**
**देखि भरत गति अकथ अतीवा। प्रेम मगन मृग खग जड़ जीवा॥**

"त्याने आनंदाने श्रीरामांची पदचिन्हे पाहिली, तेव्हा दरिद्र्याला परीस मिळावा, तसे त्याला वाटले. तेथील धूळ घेऊन ती त्याने मस्तकावर ठेवली, छातीला लावली व डोळ्यांना लावली. त्यामुळे श्रीरामांना प्रत्यक्ष भेटल्याचे सुख त्याला झाले. भरताची ही अवर्णनीय दशा पाहून, पशु-पक्षी, इतकेच काय वृक्षपाषाणही प्रेममग्न झाले."

अध्यात्मरामायणात सांगितले आहे -

**स तत्र वज्राङ्कुशवारिजाञ्चितध्वजादिचिह्नानि पदानि सर्वतः।**
**ददर्श रामस्य भुवोऽतिमङ्गलान्यचेष्टयत्पादरजःसु सानुजः॥**
**अहो सुधन्योऽहममूनि रामपादारविन्दाङ्कितभूतलानि।**
**पश्यामि यत्पादरजो विमृग्यं ब्रह्मादिदेवैः श्रुतिभिश्च नित्यम्॥**

(अयोध्या. ९।२-३)

"भरताने तिथे सगळीकडे भगवान श्रीरामचन्द्रांच्या वज्र, अङ्कुश, कमल आणि ध्वजा वगैरे चिह्नांनी सुशोभित आणि पृथ्वीसाठी अति मंगलमय पदचिह्ने पाहिली. ती पाहून बंधू शत्रुघ्नासहित तो त्या चरणधुळीत लोळू लागला आणि मनातल्या मनात म्हणू लागला 'अहाहा ! मी धन्य आहे. कारण आज श्रीरामचन्द्रांच्या चरणकमलांच्या चिह्नाने सुशोभित भूमीला मी पाहात आहे; ज्यांच्या चरणधुळीला ब्रह्मा इत्यादी देवगण, तसेच सगळ्या श्रुती सदा शोधतात."

जेव्हा चित्रकूटावर खूप आग्रह करून सुध्दा भगवान श्रीराम अयोध्येस परत येण्यास तयार झाले नाहीत, तेव्हा भरत म्हणाला-

**अधिरोहार्य पादाभ्यां पादुके हेमभूषिते।**
**एते हि सर्वलोकस्य योगक्षेमं विधास्यतः॥**
**चतुर्दश हि वर्षाणि जटाचीरधरो ह्यहम्॥**
**फलमूलाशनो वीर भवेयं रघुनन्दन।**
**तवागमनमाकाङ्क्षन् वसन् वै नगराद् बहिः॥**
**तव पादुकयोर्न्यस्य राज्यतन्त्रं परंतप।**
**चतुर्दशे हि सम्पूर्णे वर्षेऽहनि रघूत्तम॥**
**न द्रक्ष्यामि यदि त्वां तु प्रवेक्ष्यामि हुताशनम्।**

**(वा. रा. अयोध्या. ११२।२१,२३-२६)**

"आर्य ! आपण या दोन्ही सुवर्णभूषित पादुकांवर आपले चरण ठेवा. याच संपूर्ण जगाचा योगक्षेम वाहतील. वीर रघुनन्दना! मी सुध्दा चौदा वर्षे जटा आणि वल्कले धारण करून कंदमूळ व फळांचेच सेवन करीन. हे परंतपा ! आपल्या येण्याची वाट बघत नगराच्या बाहेरच

राहीन. तोपर्यन्त राज्याचा सगळा भार आपल्या या चरणपादुकांवरच राहील. रघुनाथा ! चौदा वर्षे पूर्ण झाल्यानंतर पहिल्याच दिवशी जर मला आपले दर्शन झाले नाही, तर मी अग्निप्रवेश करीन.''

अध्यात्मरामायणात भरताने म्हटले आहे -

**पादुके देहि राजेन्द्र राज्याय तव पूजिते।**
**तयोः सेवां करोम्येव यावदागमनं तव॥**

(अयोध्या. ९। ४९)

''राजेन्द्रा ! आपण मला राज्यशासनासाठी आपल्या जगत्पूज्य पादुका द्या. आपण परत येईपर्यन्त मी त्यांचीच सेवा करीत राहीन.''

**इत्युक्त्वा पादुके दिव्ये योजयामास पादयोः।**
**रामस्य ते ददौ रामो भरतायातिभक्तितः॥**
**गृहीत्वा पादुके दिव्ये भरतो रत्नभूषिते।**
**रामं पुनः परिक्रम्य प्रणनाम पुनः पुनः॥**
**भरतः पुनराहेदं भक्त्या गद्गदया गिरा।**
**नवपञ्चसमान्ते तु प्रथमे दिवसे यदि॥**
**नागमिष्यसि चेद् राम प्रविशामि महानलम्।**

(अध्यात्म. अयोध्या. ९। ५०-५३)

''असे सांगून भरताने श्रीरामचन्द्रांच्या चरणात त्या दोन दिव्य पादुका चढविल्या. श्रीरामचन्द्रांनी भरताचा भक्तिभाव बघून त्या पादुका भरताला दिल्या. भरताने त्या रत्नजडित दिव्य पादुका घेऊन मग श्रीरामचन्द्रांना प्रदक्षिणा घातली आणि वारंवार नमस्कार केला. आणि नंतर प्रेमपूर्ण गद्गद वाणीने म्हणाला - प्रभो ! जर चौदा वर्षे पूर्ण झाल्यानंतरच्या पहिल्याच दिवशी आपण अयोध्येला परत आला नाही, तर मी अग्निप्रवेश करीन.''

तुलसीदास म्हणतात -

**प्रभु करि कृपा पाँवरीं दीन्हीं। सादर भरत सीस धरि लीन्हीं॥**

“प्रभूंनी कृपा करून पादुका दिल्या त्या भरताने आपल्या मस्तकावर धारण केल्या.”

महाभारतात सांगितले आहे -

**विसर्जितः स रामेण पितुर्वचनकारिणा।**
**नन्दिग्रामेऽकरोद् राज्यं पुरस्कृत्यास्य पादुके॥**

(वन. २७७।३९)

“पित्याच्या वचनाचे पालन करणाऱ्या श्रीरामचन्द्रांनी निरोप दिल्यावर भरत नन्दिग्रामात आला आणि त्या रघुनन्दनाच्या पादुका समोर ठेवून राज्यकारभार करू लागला.”

वाल्मीकि-रामायणात असे वर्णन आहे की, भरत नन्दिग्रामात जाऊन थोरा-मोठ्यांना असे म्हणाला -

**एतद् राज्यं मम भ्रात्रा दत्तं संन्यासमुत्तमम्।**
**योगक्षेमवहे चेमे पादुके हेमभूषिते॥**

(अयोध्या. ११५।१४)

“माझे बन्धू श्रीरामांनी मला उत्तम ठेवीच्या रूपात हे राज्य दिले आहे आणि त्याच्या योगक्षेमासाठी या दोन स्वर्णभूषित पादुका दिल्या आहेत.”

नंतर प्रजाजनांना सांगू लागला -

**छत्रं धारयत क्षिप्रमार्यपादाविमौ मतौ।**
**आभ्यां राज्ये स्थितो धर्मः पादुकाभ्यां गुरोर्मम॥**

(वा. रा. अयोध्या. ११५।१६)

“या पादुका आर्य श्रीरामचन्द्रांच्या चरणांच्या प्रतिनिधी आहेत, म्हणून लगेच यांच्यावर छत्र धारण करा. माझे गुरू श्रीरामचन्द्रांच्या या पादुकांमुळेच राज्यात धर्म स्थापन होईल.”

**ततस्तु भरतः श्रीमानभिषिच्यार्यपादुके।**
**तदधीनस्तदा राज्यं कारयामास सर्वदा॥**

**तदा हि यत् कार्यमुपैति किञ्चिदुपायनं चोपहृतं महार्हम्।**
**स पादुकाभ्यां प्रथमं निवेद्य चकार पश्चाद् भरतो यथावत्॥**

( वा. रा. अयोध्या. ११५।२३-२४)

'त्यानंतर श्रीरामचन्द्रांच्या श्रेष्ठ पादुकांना अभिषेक करून आणि स्वत: सर्वस्वी त्यांच्या (पादुकांच्या) आधीन होऊन भरत राज्य करू लागला. त्यावेळी जे काही काम असे किंवा जी काही बहुमूल्य भेट येई, ती भरत पहिल्यांदा पादुकांना निवेदन करी आणि त्यानंतर त्याचा विनियोग करी.'

**ददर्श भरतं दीनं कृशमाश्रमवासिनम्।**
**जटिलं मलदिग्धाङ्गं भ्रातृव्यसनकर्शितम्॥**
**फलमूलाशिनं दान्तं तापसं धर्मचारिणम्।**
**समुन्नतजटाभारं वल्कलाजिनवाससम्॥**
**नियतं भावितात्मानं ब्रह्मर्षिसमतेजसम्।**
**पादुके ते पुरस्कृत्य प्रशासन्तं वसुन्धराम्॥**

(वा. रा. युद्ध १२५ ।-३०-३२)

श्री हनुमंताने नन्दिग्रामात येऊन पाहिले की, भरत कृश आणि दीन झाला आहे व आश्रमात राहात आहे. जटा वाढल्या आहेत, शरीर मळले आहे, भावाच्या वनवासाच्या दु:खाने त्याला अतीव कृश केले आहे. फळे-मुळे हेच त्याचे भोजन आहे. तो इन्द्रियदमन करून तपस्या करीत आहे आणि धर्माने वागत आहे. त्याच्या मस्तकावर जटांचा भार आहे आणि शरीरावर वल्कले आणि मृगचर्माचे वस्त्र आहे. त्याचे जीवन अतिशय नियमित आहे आणि अंत:करण भगवंताच्या ध्यानामुळे विशुद्ध आहे. असा ब्रह्मर्षीप्रमाणे तेजस्वी भरत श्रीरघुनाथाच्या त्या पादुकांना समोर ठेवून पृथ्वीचे राज्य करीत आहे.

महाभारतातही आले आहे की,

**स तत्र मलदिग्धाङ्गं भरतं चीरवाससम्॥**
**अग्रतः पादुके कृत्वा ददर्शासीनमासने।**

(वन. ३९१।६२-६३)

"वनवासातून परतल्यावर भगवान श्रीरामचन्द्रांनी नन्दिग्रामात येऊन वल्कले परिधान केलेल्या मळलेल्या शरीराच्या भरताला पादुका समोर ठेवून आसनावर बसलेले पाहिले."

श्रीरामचन्द्रांना येताना पाहून तो फार प्रसन्न झाला आणि -

**आर्यपादौ गृहीत्वा तु शिरसा धर्मकोविदः॥**
**पाण्डुरं छत्रमादाय शुक्लमाल्योपशोभितम्।**
**शुक्ले च वालव्यजने राजार्हे हेममभूषिते॥**

---------------------

**प्रत्युद्ययौ तदा रामं महात्मा सचिवैः सह।**

(वा. रा. युद्ध. १२७।१८-१९,२१)

"धर्मज्ञ भरताने वडील बंधू श्रीरामचन्द्रांच्या पादुका मस्तकावर ठेवल्या आणि श्वेत मालांनी सुशोभित पांढऱ्या रंगाचे छत्र आणि राजासाठी योग्य अशा सोन्याने मढलेल्या दोन पांढऱ्या चवऱ्याही घेतल्या. आणि महात्मा भरत मंत्र्यांसोबत श्रीरामचन्द्रांना सामोरी जाण्यासाठी निघाला"

अध्यात्मरामायणात लिहिले आहे की -

**भरतः पादुके न्यस्य शिरस्येव कृताञ्जलिः॥**
**शत्रुघ्नसहितो रामं पादचारेण निर्ययौ।**

(अध्यात्म. युद्ध. १४।७५-७६)

"श्रीरघुनन्दनांना भेटण्यासाठी बन्धू शत्रुघ्नासहित भरत मस्तकावर भगवान श्रीरामचन्द्रांच्या पादुका ठेवून, हात जोडून पायीच निघाला."

अशा प्रकारे चरण-पादुकांना चरणांसम समजून अखंड सेवा करण्याचा भाव, कथा किंवा चरित्र भरताच्याआधी कुठेही पहावयास मिळत नाही. म्हणून आम्हांला भरताला आदर्श समजून भगवंताचे चरण, चरण-पादुका आणि चरणधुळीची सेवा करावयास हवी.



# अर्चन

धातू वगैरेपासून बनविलेली मूर्ती किंवा चित्र किंवा श्रीभगवंतांच्या भक्तांच्या तोंडून ऐकलेल्या भगवंतांच्या स्वरूपाचे बाह्य सामग्रींनी तसेच भगवंताच्या मानसिक मूर्तींचे मानसिक सामग्रींनी तसेच त्यांच्या साक्षात विग्रह आणि चरणांचे नानाविध उपचारांनी श्रद्धायुक्त भक्तीने सेवन पूजन करणे आणि त्याचे तत्त्व, रहस्य आणि प्रभाव जाणून प्रेममुग्ध होणे, म्हणजेच 'अर्चन भक्ती' होय.

हे लक्षणसुध्दा भरतामध्ये विद्यमान होते. साक्षात भगवान श्रीरामचन्द्रांची प्रेमाने पूजा करण्याची गोष्ट सोडा. भगवंतांच्या अनुपस्थितीत भरत मनाने भगवंतांना आसनावर बसवून मनानेच त्यांची सेवा-पूजा करीत असे. जेव्हा भरत भरद्वाजाच्या आश्रमात गेला, तेव्हा तिथे भरद्वाजाने भरताच्या आतिथ्यासाठी सिद्धीने राजमहाल रचून भरतासाठी राजास योग्य अशा सिंहासनाची स्थापना केली. पण भरत त्या सिंहासनावर बसला नाही, पण त्याने साक्षात भगवान श्रीरामाचे सिंहासन मानून स्वत: मंत्री बनून रात्रभर चवऱ्या ढाळून भगवंतांची सेवा करीत राहिला. वाल्मीकी म्हणतात-

**तत्र राजासनं दिव्यं व्यजनं छत्रमेव च।**
**भरतो मन्त्रिभिः सार्धमभ्यवर्तत राजवत्॥**
**आसनं पूजयामास रामायाभिप्रणम्य च।**
**वालव्यजनमादाय न्यषीदत्सचिवासने॥**

( वा. रा. अयोध्या - ९१।३८-३९ )

"भरताने तिथे दिव्य सिंहासन, छत्र आणि चामर पाहिले. आणि मग त्या ठिकाणी राजाची कल्पना करून मंत्र्यांसोबत त्या सर्वांना प्रदक्षिणा घातली. 'सिंहासनावर श्रीरामचन्द्रच विराजमान आहेत,' असे मानून त्यांनी श्रीरामाला नमस्कार केला. आणि त्या सिंहासनाची पूजा केली. नंतर आपल्या हातात चवऱ्या घेऊन तो मंत्र्याच्या आसनावर जाऊन बसला."

भरताने अशा प्रकारे सेवा-पूजन करीत तिथेच रात्र घालविली. खरोखर किती अद्वितीय सेवा-पूजा !

भरत नन्दिग्रामात आल्यावर राजसिंहासनावर भगवंताच्या जागेवर भगवंताच्या चरण-पादुका स्थापन करून त्याची पत्र, पुष्प, गन्ध वगैरेंनी शास्त्रोक्त पूजा करी.

अध्यात्मरामायणात सांगितले आहे -

**तत्र सिंहासने नित्यं पादुके स्थाप्य भक्तितः॥**
**पूजयित्वा यथा रामं गन्धपुष्पाक्षतादिभिः।**
**राजोपचारैरखिलैः प्रत्यहं नियतव्रतः॥**
**राजकार्याणि सर्वाणि यावन्ति पृथिवीतले।**
**तानि पादुकयोः सम्यङ् निवेदयति राघवः॥**

( अयोध्या. ९। ७१-७२, ७४ )

"तिथे एका सिंहासनावर त्या दोन्ही पादुका ठेवून तो नियमित व्रतस्थ रघुश्रेष्ठ भरत प्रत्यक्ष श्रीरामचन्द्रांप्रमाणेच त्यांच्या चरणपादुकांची नित्य भक्तिभावाने गन्ध, पुष्प आणि अक्षता वगैरे राजोचित सामग्रीने पूजा केल्यानंतर रोजची जी राज्याची कामे असत, ती पादुकांच्या समोर विधिवत निवेदन करीत असत."

अशा प्रकारे पद्मपुराणातही आले आहे -

**रामस्य पादुके राज्यमवाप्य भरतः शुभे।**
**प्रत्यहं गन्धपुष्पैश्चापूजयत् कैकयीसुतः॥**
**तपश्चरणयुक्तेन तस्मिंस्तस्थौ नृपोत्तमः।**

( उत्तर. २६९ । १९०-१९१ )

"कैकयीनन्दन भरत श्रीरामचन्द्रांच्या त्या मङ्गलमयी पादुकांना राज्यसिंहासनावर स्थापन करून नित्य गन्ध-पुष्प वगैरेंनी पूजा करी. अशा प्रकारे नृपश्रेष्ठ भरत त्या नन्दिग्रामात तपस्या करीत राहू लागला."

श्री तुलसीदासांनी म्हटले आहे -

**नित पूजत प्रभु पाँवरी प्रीति न हृदयँ समाति।**
**मागि मागि आयसु करत राज काज बहु भाँति॥**

“नेहमी प्रभुपादुकांची पूजा करताना भरताच्या हृदयात प्रेम मावत नसे. त्या पादुकांची आज्ञा घेऊनच तो निरनिराळी राजकार्ये करीत असे.”

भगवंतांच्या श्रीविग्रहाची पूजा शास्त्रात ठिकठिकाणी पहावयास मिळते. परंतु भगवंतांच्या जागी चरण-पादुका ठेवून त्यांचीसुध्दा श्रद्धायुक्त प्रेमाने पूजा करणे, हे भरताचेच काम आहे. खरोखर धन्य आहे भरताची आणि त्याच्या अलौकिक अर्चन-भक्तीची !

चौदा वर्षे पूर्ण झाल्यावर जेव्हा श्रीरामचन्द्र अयोध्येला परत येत होते, तेव्हा भरताने प्रत्यक्ष विमानावर बसलेल्या श्रीरामचन्द्रांचे अर्घ्य-पाद्यादींनी विधिवत पूजन केले.

**प्राञ्जलिर्भरतो भूत्वा प्रहृष्टो राघवोन्मुखः।**
**यथार्थेनार्घ्यपाद्याद्यैस्ततो राममपूजयत्॥**

**(वा. रा. युद्ध. १२७।३६ )**

“भरत प्रसन्नतेने श्रीरामचन्द्रांकडे दृष्टी लावून हात जोडून उभा राहिला. नंतर त्याने विमानात बसलेल्या श्रीरामचन्द्रांची विधिवत अर्घ्य-पाद्य वगैरेंनी पूजा केली.”

अशा प्रकारे रामचरित्रात जिथे-तिथे भरताने पूजा केल्याचे अनेक उल्लेख मिळतात. आम्हांलासुध्दा भरताचा आदर्श ठेवून भगवंताची सेवा-पूजा करण्यास तत्पर राहावयास हवे.



## वन्दन

भगवंताचे शास्त्रवर्णित स्वरूप, भगवंताचे नाव, भगवंताची धातू वगैरेची मूर्ती, चित्र किंवा मानस मूर्तीला आणि भगवंताच्या साक्षात चरणांना शरीर अथवा मनाने श्रध्देने प्रणाम करणे आणि प्रणाम करता-करता भगवत्प्रेमात मुग्ध होणे ही ‘वन्दन-भक्ती’ आहे. हे लक्षणसुध्दा भरतात विद्यमान होते. भरताच्या वन्दन-भक्तीविषयी काय सांगावे ! जेव्हा तो श्रीरामचन्द्रांना परत आणण्यासाठी चित्रकूटास जात होता,

तेव्हा त्याने संपूर्ण रस्ता नमस्कार करीत पार केला करीत आणि चित्रकूटास गेल्यावर तर भगवंताच्या चरणी साष्टांग दण्डवत घातला आणि करुण भावाने विव्हल झाला. तुलसीदासांनी लिहिले आहे -

**सखा बचन सुनि बिटप निहारी। उमगे भरत बिलोचन बारी॥**
**करत प्रनाम चले दोउ भाई। कहत प्रीति सारद सकुचाई॥**

"मित्राचे बोलणे ऐकून आणि झाडांकडे पाहून भरताच्या नेत्रातून अश्रुधारा वाहू लागल्या. दोन्ही भाऊ नमस्कार करीत करीत चालले. त्यांच्या प्रेमाचे वर्णन करण्यास सरस्वतीसुध्दा संकोचित झाली."

**कहत सप्रेम नाइ महि माथा। भरत प्रनाम करत रघुनाथा॥**

लक्ष्मणाने प्रेमाने जमिनीवर मस्तक नमविले व म्हटले, हे रघुनाथा!! भरत आपल्याला प्रणाम करीत आहे."

**सानुज भरत उमगि अनुरागा। धरि सिर सिय पद पदुम परागा॥**
**पुनि पुनि करत प्रनाम उठाए। सिर कर कमल परसि बैठाए॥**

"शत्रुघ्नासह भरताने प्रेमभराने सीतेच्या चरणकमलांची धूळ मस्तकावर धारण केली व ते वारंवार नमस्कार करू लागले. तेव्हा सीतेने त्यांना उठवून त्यांच्या मस्तकाला स्पर्श केला व दोघांना बसवून घेतले."

श्री अध्यात्मरामायणात सांगितले आहे -

**मातुर्मे दुष्कृतं किञ्चित्स्मर्तुं नार्हसि पाहि नः॥**
**इत्युक्त्वा चरणौ भ्रातुः शिरस्याधाय भक्तितः।**
**रामस्य पुरतः साक्षाद्दण्डवत्पतितो भुवि॥**

( अयोध्या. ९।२५-२६ )

"माझ्या आईचा जो अपराध असेल तो विसरा आणि आमचे रक्षण करा, असे म्हणून भरताने बन्धू श्रीरामचन्द्रांच्या चरणांवर भक्तिभावाने मस्तक टेकले आणि तो साक्षात श्रीरामचन्द्रांसमोर दण्डवत भूमीवर पडला."

चित्रकूटाहून परततानासुद्धा भरत भगवंतांना प्रणाम करून दुःखित हृदयानेच परतला.

श्री गोस्वामी तुलसीदास म्हणतात -

**अस कहि प्रेम बिबस भए भारी। पुलक सरीर बिलोचन बारी॥**
**प्रभु पद कमल गहे अकुलाई। समउ सनेहु न सो कहि जाई॥**

“एवढे बोलून भरत प्रेमसागरात बुडून गेला. त्याच्या शरीरावर रोमांच उभे राहिले. डोळे पाण्याने भरून आले. व्याकूळ होऊन त्याने प्रभूंचे चरणकमल धरले. ती वेळ आणि ते प्रेम यांचे वर्णन करता येण्यासारखे नाही.”

**प्रभु पद पदुम बंदि दोउ भाई । चले सीस धरि राम रजाई॥**

“प्रभूंच्या चरणकमलांना वंदन करून व श्रीरामांची आज्ञा शिरसावंद्य मानून दोन्ही भाऊ निघाले.”

जेव्हा श्रीरामचन्द्र वनवासाहून अयोध्येला परत आले, तेव्हा भरताने त्यांच्या पायाला मिठी घातली. खरे तर भरत ते चरण सोडू इच्छित नव्हता, पण भगवंताने बळेबळेच त्याला उठवून हृदयाशी कवटाळले. त्यावेळी भरताने सीतामाईलाही प्रणाम केला आणि स्वतःला अपराधी समजून स्वतःच्या अपराधासाठी क्षमायाचना केली.

श्रीवाल्मीकि-रामायणात वर्णिले आहे -

**ततो विमानाग्रगतं भरतो भ्रातरं तदा।**
**ववन्दे प्रणतो रामं मेरुस्थमिव भास्करम्॥**
**आरोपितो विमानं तद् भरतः सत्यविक्रमः।**
**राममासाद्य मुदितः पुनरेवाभ्यवादयत्॥**
**ततो लक्ष्मणमासाद्य वैदेहीं च परंतपः।**
**अथाभ्यवादयत्प्रीतो भरतो नाम चाब्रवीत्॥**

(युद्ध. १२७।३८, ४०, ४२)

“त्यावेळी भरताने विमानाच्या अग्रभागी विराजमान असलेल्या बन्धू श्रीरामांना पाहिले आणि ज्याप्रमाणे लोक मेरुपर्वतावर दिसणाऱ्या सूर्याला नमस्कार करतात, त्याप्रमाणे श्रीरामांना विनयाने नमस्कार केला. भगवान श्रीरामांनी सत्यपराक्रमी भरताला त्या विमानावर घेतले. भरताने श्रीरामचन्द्रांजवळ पोहोताच पुन्हा प्रसन्नचित्ताने नमस्कार केला.

त्यानंतर लक्ष्मणाला भेटून परंतप भरताने आपले नाव सांगून सीतामाईला अभिवादन केले.''

साधारण असेच वर्णन अध्यात्मरामायणातही आहे. तिथे म्हटले आहे -

**आरोपितो विमानं तद् भरतः सानुजस्तदा।**
**राममासाद्य मुदितः पुनरेवाभ्यवादयत्॥**
**ततो लक्ष्मणमासाद्य वैदेहीं नाम कीर्तयन्।**
**अभ्यवादयत प्रीतो भरतः प्रेमविह्वलः॥**

(युद्ध. १४/८३, ८५)

''त्यावेळी भगवान श्रीरामचन्द्रांनी बंधू शत्रुघ्नासहित भरताला विमानात घेतले. श्रीरामचन्द्रांच्या जवळ पोचल्यावर भरताने अतिशय आनंदाने त्यांना पुन्हा नमस्कार केला. पुन्हा प्रेमविह्वल होऊन लक्ष्मणाला भेटून सीतामाईला आपल्या नावाचा उच्चार करून प्रेमपूर्वक नमस्कार केला.''

त्यावेळी भरताची जी अवस्था झाली, तिचे वर्णन करताना पद्मपुराणात सांगितले आहे -

**दृष्ट्वा समुत्तीर्णमिमं रामचन्द्रं स तैर्युतम्।**
**हर्षाश्रूणि प्रमुञ्चश्च दण्डवत् प्रणनाम ह॥**
**उत्थापितोऽपि च भृशं नोदतिष्ठद् रुदन् मुहुः।**
**रामचन्द्रपदाम्भोजग्रहणासक्तबाहुभृत् ॥**
**पतिव्रतां जनकजाममन्यत ननाम च।**
**मातः क्षमस्व यदघं मया कृतमबुद्धिना॥**

(पद्म. पाताल. २/२९, ३१, ३७-३८)

''त्या सर्वांसहित श्रीरामचन्द्रांना भूमीवर उतरताना बघून भरताच्या नेत्रातून आनंदाश्रू वाहू लागले आणि रामचन्द्रांसमोर तो दण्डवत भूमीवर पडला. सुरवातीला पुन्हा पुन्हा उठवूनही तो उठेना. आपल्या दोन्ही हातांनी श्रीरामचन्द्रांचे चरण घट्ट धरून तो हमसाहमशी रडू लागला. त्यानंतर पतिव्रता जनक किशोरीचे दर्शन करून भरताने तिला सन्मानाने

नमस्कार केला आणि म्हटले,'आई ! मी मूर्खाने जो अपराध केला आहे, तो क्षमा करा.'

श्रीरामचरितमानसात त्याचे असे वर्णन आहे -

**गहे भरत पुनि प्रभु पद पंकज। नमत जिन्हहि सुर मुनि संकर अज ॥**
**परे भूमि नहीं उठत उठाए। बर करि कृपासिंधु उर लाए॥**
**स्यामल गात रोम भए ठाढ़े। नव राजीव नयन जल बाढ़े॥**

''ज्यांच्या चरणकमलांना देव, ऋषी, शंकर, ब्रह्मा आदींनी वंदन केले आहे, असे प्रभूंचे चरण भरताने पुन्हा धरले. भरताने जमिनीवर लोटांगण घातले. त्याला कितीही उठवले तरी तो उठेना. तेव्हा कृपासिंधू श्रीरामांनी बळेच त्याला उठवून आपल्या छातीशी कवटाळले. प्रभूंच्या सावळ्या शरीरावर रोमांच उभे राहिले. आणि ताज्या कमळासारख्या डोळ्यांत अश्रू दाटून आले.''

प्रेम आणि विनयाची किती सुंदर अवस्था आहे ! भरत प्रेम आणि विनयाची मूर्ती होता. वन्दन करणे हा त्याचा स्वभावच झाला होता. जेव्हा कधी तो भगवंतांना भेटे, तेव्हा तेव्हा त्यांना नमस्कार करी. त्याची ही आदर्श 'वन्दन-भक्ती' आम्हांलासुद्धा अनुकरणीय आहे.



# दास्य

भगवंतांचे गुण, तत्त्व, रहस्य प्रभावाला जाणून श्रद्धेने त्यांची सेवा करणे आणि त्यांच्या आज्ञेचे पालन करणे व प्रभूला स्वामी आणि स्वत:ला सेवक समजणे 'दास्य- भावरूप भक्ती' आहे.

हा भाव भरतामध्ये पदोपदी दिसतो. हा त्याचा मुख्य भाव आहे. जेव्हा भरत आजोळाहून अयोध्येला परत आला, तेव्हा त्याने कैकेयीला सांगितले की, मी रामचन्द्रांना परत आणून त्यांचा दास होऊन त्यांची सेवा करीन. नंतर गुरू वसिष्ठांनी आणि मंत्र्यांनी त्याला राज्य देण्याचे खूप प्रयत्न केले, पण प्रत्युत्तर म्हणून भरताने हेच सांगितले की 'मला यात आपले किंवा माझे कुणाचेच हित दिसत नाही. मी त्यांच्या सेवेतच माझे हित

समजतो.' भरताचा हा भाव बघून सगळे मुग्ध झाले. याच भावनेने भरत रामचन्द्रांना परत आणण्यासाठी अयोध्येहून चित्रकूटास निघाला. वाटेत जिथे जिथे तो थांबला तिथे तिथे त्यांच्या वागणुकीत आणि बोलण्यात हाच भाव दिसे. चित्रकूटावरही त्याच्या प्रत्येक कृतीत हाच भाव दिसत होता. कारण दास्यभावाचे ते एक चालते बोलते उदाहरण होते. त्याने आजीवन भगवान रामचन्द्रांची सेवा करणे आणि त्यांच्या आज्ञेचे पालन करणे हाच आपला धर्म मानला होता. आणि त्यातच तो आपले कल्याण समजत असे. त्याच्या दृष्टीने भगवान श्रीरामाच्या सेवेहून अधिक दुसरे कुठले कामच नव्हते. भगवंतांची कठिणात कठीण आज्ञा त्याला शिरोधार्य होती. भरत आपल्या स्वामीला संकोचात टाकणे पाप समजत असे. भगवान श्रीरामांच्या आज्ञापालनासाठीच त्याला चौदा वर्षेपर्यन्त श्रीरामचन्द्रांचा वियोग सहन करावा लागला. राज्याचे काम करताना पदोपदी त्याचा श्रीरामाठायीचा सेवाभाव दिसत असे. चौदा वर्षांनंतर भगवंत परत आल्यावर भरताने त्यांचे राज्य त्यांच्या चरणी अर्पण करून तो आजीवन त्यांची सेवा व आज्ञापालन करू लागला. कधी नगराबाहेर जाणे झाले, तर तिथेसुध्दा त्यांची सेवा करणे आणि आपल्या हितासाठी उपदेशाच्या गोष्टी विचारणे, हे त्याचे मुख्य काम होते. अशा प्रकारे भरताने आजीवन मुख्यत: दास्य-भावातच आपला वेळ घालवला.

त्याची सेवा, आज्ञापालन आणि प्रेमभाव बघून भगवंत स्वत: मुग्ध होते. याविषयी त्याची जितकी प्रशंसा करावी, तितकी थोडीच आहे. प्रेमाने आणि विनयाने सेवा करण्यासाठी भरत आदर्श होता. भरताचे सगळेच आचरण दासभावाचे द्योतक आहे: पण काही काही जागी तर केवळ दासभावाची प्रधानता आहे. आता त्याची काही उदाहरणे पुढे दिली आहेत.

कैकेयी मातेस भरत म्हणतो -

**निवर्तयित्वा रामं च तस्याहं दीप्ततेजस:।**
**दासभूतो भविष्यामि सुस्थितेनान्तरात्मना।।**

(वा. रा. अयोध्या ७३ / २७)

"मी श्रीरामांना परत आणीन आणि त्या देदीप्यमान तेजस्वी महापुरुषाचा दास होऊन सुस्थिर आणि शान्तचित्ताने जीवन व्यतीत करीन."

अध्यात्मरामायणातही आले आहे -

**गच्छाम्यारण्यमद्य स्थिरमतिरखिलं दूरतोऽपास्य राज्यम्**
**रामं सीतासमेतं स्मितरुचिरमुखं नित्यमेवानुसेवे ॥**

**(अयोध्या. ७/११४)**

"मी निश्चय केला आहे की, मी संपूर्ण राज्याचा त्याग करून आजच वनात जाईन आणि मंद मधुर हास्याने ज्यांचे मुखारविन्द शोभत आहे, अशा त्या श्रीरामांची आणि सीतामाईंची सेवा करीन."

भरत गुरू वसिष्ठांना आणि मंत्र्यांना म्हणाला -

**हित हमार सियपति सेवकाईं। सो हरि लीन्ह मातु कुटिलाईं ॥**

भरत मार्गात नावाडी-गुहाला म्हणाला -

**अहं रामस्य दासा ये तेषां दासस्य किङ्करः।**
**यदि स्यां सफलं जन्म मम भूयान्न संशयः ॥**

**(अध्यात्म. अयोध्या. ८/३३)**

"जे लोग प्रभू रामचन्द्रांचे दास आहेत, त्यांच्या दासांचा जरी मी अनुचर झालो, तरी निःसंदेह माझा जन्म सफल होईल."

किती सुंदर दासभाव आहे !

चित्रकूटावर जाऊन भरत प्रभू श्रीरामाला म्हणतात -

**अहमप्यागमिष्यामि सेवे त्वां लक्ष्मणो यथा।**
**नो चेत्प्रायोपवेशेन त्यजाम्येतत्कलेवरम् ॥**

**(अध्यात्म. अयोध्या. ९/३९)**

"(अस्सं ! जर आपण वनातून परत येऊ इच्छित नसाल तर मला आज्ञा द्या, म्हणजे) मीसुद्धा वनात राहून लक्ष्मणाप्रमाणे आपली सेवा करीन. नाहीपेक्षा मी अन्न-जलाचा त्याग करून शरीराचा त्याग करीन." भगवंतांच्या सेवेसाठी भरताचा हा किती आग्रह आहे !

पण नंतर भगवंतांचा स्वभाव आठवून भरत म्हणू लागला -

**अब करुनाकर कीजिअ सोई । जन हित प्रभु चित छोभु न होई ।।**
**जो सेवकु साहिबहि सँकोची । निज हित चहइ तासु मति पोची ।।**
**सेवक हित साहिब सेवकाई । करै सकल सुख लोभ बिहाई ।।**

"हे दयानिधाना ! ज्यामुळे या दासासाठी आपल्या मनाला त्रास होणार नाही, तेच करा. जो सेवक स्वामींना अडचणीत टाकून आपले कल्याण इच्छितो, त्याची बुद्धी नीच समजावी. सेवकाचे कल्याण त्यातच आहे की, त्याने सर्व सुखे आणि लोभ सोडून देऊन स्वामीचीच सेवा करावी."

भगवंत अयोध्येस परत आल्यानंतर जेव्हा केव्हा भरत त्यांच्याबरोबर कुठल्या उपवनात किंवा आमराईत जाई, तर तिथेसुद्धा सेवा करीत राही. तुलसीदासजी म्हणतात -

**सुनि प्रभु बचन भरत गहे चरना । सुनहु नाथ प्रनतारति हरना ।।**
**करउँ कृपानिधि एक ढिठाई । मैं सेवक तुम्ह जन सुखदाई ।।**

"प्रभूंचे बोलणे ऐकून भरताने त्यांचे पाय धरले व तो म्हणाला, हे शरणागतांचे दुःख नाहीसे करणारे नाथ ! ऐका. हे कृपानिधान ! मी एक धाडसाचे विधान करतो की, मी सेवक आहे. आणि आपण सेवकाला सुख देणारे आहात."

**हरन सकल श्रम प्रभु श्रम पाई । गए जहाँ सीतल अवँराई ।।**
**भरत दीन्ह निज बसन डसाई । बैठे प्रभु सेवहिं सब भाई ।।**

"संसारातील सर्व कष्ट दूर करणाऱ्या प्रभूंनी (हत्ती, घोडे इ. वाटण्याचे) श्रम अनुभवले आणि (शीण घालवण्यासाठी) ते शीतल आमराईत गेले. तेथे भरताने आपला शेला अंथरला. त्यावर प्रभू बसले आणि सर्व भाऊ त्यांची सेवा करू लागले."

अशाप्रकारे भरत नित्य भगवंतांच्या सेवेतच असे. भरताच्या या आदर्श सेवाभावाची धन्य असो ! भरताच्या चरित्राचे नीट मनन करून त्यांच्या सेवाभावाला आदर्श मानून आम्हांला त्याचे अनुकरण करावयास हवे.



# सख्य

भगवंतांचा प्रभाव, तत्त्व, रहस्य आणि महिमा जाणून अत्यंत विश्वासपूर्वक मित्रभावाने त्यांच्या रुचीनुसार वागणे, त्यांच्यावर अनन्य प्रेम करणे, त्यांच्या गुण, रूप आणि लीलेवर मुग्ध होऊन निरन्तर प्रसन्न राहणे 'सख्यभावरूप भक्ती' आहे.

भरताच्या आचरणाने आणि भावाने केवळ सखाभाव दिसत नाही, तर दुसऱ्या भावांसोबत सखाभाव डोकावतो. जसे वाल्मीकि रामायणात म्हटले आहे -

**यो मे भ्राता पिता बन्धुर्यस्य दासोऽस्मि सम्मतः।**
**तस्य मां शीघ्रमाख्याहि रामस्याक्लिष्टकर्मणः॥**

(वा. रा. अयोध्या. ७२/३२)

भरत मातेला म्हणाला, "जो माझा बन्धू, पिता आणि नातलग आहे, तसेच ज्यांचा मी दास आहे, त्या सरळ स्वभावाच्या श्रीरामचंद्रांचा पत्ता लौकर सांग."

चित्रकूटावर भरताने भगवान श्रीरामांना प्रार्थना करताना म्हटले आहे-

**एभिश्च सचिवैः सार्धं शिरसा याचितो मया।**
**भ्रातुः शिष्यस्य दासस्य प्रसादं कर्तुमर्हसि॥**

(वा.रा. अयोध्या. १०१/१२)

"या मंत्र्यांच्या बरोबर नतमस्तक होऊन मी आपल्याला निवेदन करतो की, मी आपला भाऊ, शिष्य आणि दास आहे. माझ्यावर आपण दया करा."

वरील श्लोकात शिष्य, दास, पिता या शब्दांसोबत बन्धू आणि भ्राता शब्दही आहेत. जे सख्यभावाचे द्योतक आहेत. तसेच 'भ्राता' शब्दासोबत 'बन्धु' शब्दाचा वेगळा प्रयोग करणे सखाभाव दर्शविते. म्हणून भरताचा भाऊ, दास, शिष्य वगैरे भावांबरोबर सखाभावसुद्धा होता. भ्रातृत्वभावातही बरोबरीचा भाव असल्याने सखाभाव डोकावतो.

तुलसीकृत रामायणातही ही गोष्ट दिसते. भरताचेच वचन आहे -

**प्रभु पितु मातु सुहृद गुर स्वामी। पूज्य परम हित अंतरजामी॥**

"प्रभू माझे माता, पिता, सुहृद, गुरू, स्वामी, पूज्य, परम हितकर्ते आणि अंतर्यामी आहेत."

**सुहृद सुजान सुसाहिबहि बहुत कहब बडि खोरि।**
**आयसु देइअ देव अब सबइ सुधारी मोरि॥**

"मित्र, बुद्धिमान आणि श्रेष्ठ स्वामी अशा आपल्याला अधिक काही सांगणे हा मोठा अपराध आहे. म्हणून हे देवा ! आता मला आज्ञा द्या. आपण माझ्या सर्व गोष्टी सुधारून घेतल्या."

या चौपाई दोह्यात प्रभू, पिता, माता, गुरू, स्वामी, पूज्य, हित वगैरे शब्दांसोबत 'सुहृद' शब्दाचा प्रयोग केला गेला आहे. ज्याचा अर्थ इतर शब्दांहून वेगळा आहे, म्हणून इथे 'सुहृद्' शब्द सखाभावदर्शक आहे. यात काही शंका नाही की, भरताचा श्रीरामाच्या ठायी मुख्यत: दास्यभाव असूनही भ्रातृत्व आणि प्रेमाच्या नात्याने मित्रभावसुद्धा होता.

भगवान श्रीरामाच्या वागण्यातही भावांबरोबर सख्यभाव प्रगट होतो. वनगमनाआधी राजतिलकाच्या तयारीच्या वेळी श्रीरामाचन्द्र राज्यात सगळ्या भावंडांचा समान अधिकार मानत म्हणतात की -

**जनमे एक संग सब भाई। भोजन सयन केलि लरिकाई॥**
**करनबेध उपबीत बिआहा। संग संग सब भए उछाहा॥**
**बिमल बंस यहु अनुचित एकू। बंधु बिहाइ बड़ेहि अभिषेकू॥**
**प्रभु सप्रेम पछितानि सुहाई। हरउ भगत मन कै कुटिलाई॥**

"आम्ही सर्व भाऊ एकदम जन्मलो. भोजन, झोप, लहानपणाचे खेळ, कान टोचणे, मुंज, विवाह आदी उत्सवही सर्वांचे एकदमच झाले. पण या निर्मल वंशात ही एकच अयोग्य गोष्ट होत आहे की, सर्व भावांना सोडून राज्याभिषेक फक्त थोरल्यालाच केला जात आहे. प्रभू रामचंद्रांचा हा प्रेमपूर्ण पश्चात्ताप भक्तांच्या मनातील कपट नाहीसे करो."

यात सर्व भावंडांबरोबर श्रीरामाचा मैत्रीचा भाव दिसतो. लक्ष्मणासाठी

तर मुख्यतया 'सखा' शब्दाचा उपयोग दिसतो. वनात बरोबर जाण्यासाठी तयार झालेल्या लक्ष्मणास भगवान म्हणतात -

**स्निग्धो धर्मरतो धीरः सततं सत्पथे स्थितः।**
**प्रियः प्राणसमो वश्यो विजेयश्च सखा च मे॥**

(वा. रा. अयोध्या ३१/१०)

"लक्ष्मणा ! तू माझा परम स्नेही, धर्मपरायण, धैर्य-सम्पन्न आणि नेहमी सन्मार्गावर चालणारा आहेस. तू मला प्राणप्रिय आणि माझ्या आधीन, आज्ञापालक आणि सखा आहेस."

याशिवाय पद्मपुराणाच्या पाताळखंडात एक श्लोक मिळतो, ज्यात श्रीरामाने प्रेमविह्वल होऊन भरतासाठी पाच वेळा भाऊ (भाई) शब्दाचा उच्चार केला आहे. यात भरताकरिता बरोबरीचा तसेच आदर आणि प्रेमाचा भाव दाटला आहे. म्हणून हा सख्यभावाचाच द्योतक आहे.

**यानादवतताराशु विरहक्लिन्नमानसः।**
**भ्रातर्भ्रातः पुनर्भ्रातर्भ्रातर्भ्रातर्वदन्मुहुः॥**

(पद्म.पाताल.२/२८)

"जवळ आल्यावर भगवान श्रीरामाचे हृदय विरहाने व्याकुळ झाले आणि ते वांरवार 'भाऊ! भाऊ!!भाऊ!!!' असे म्हणत लगेच विमानातून उतरले."

तुलसीकृत रामायणातसुध्दा भरतासाठी भगवंतांनी सन्मानाने बरोबरीचा व्यवहार केल्याचे आहे.

श्रीगोस्वामी लिहितात -

**कृपासिंधु सनमानि सुबानी। बैठाए समीप गहि पानी॥**

"कृपासागर रामचंद्रांनी गोड वाणीने भरताचा सन्मान केला आणि त्याचा हात धरून त्याला जवळ बसवून घेतले."

या वागण्यातून भगवंतांचा भरताबरोबरचा सखाभाव स्पष्टपणे दिसतो.

अशा प्रकारे श्रीरामांच्या वागण्यात ठिकठिकाणी भरताबरोबर आदर-

सन्मान, बरोबरी आणि प्रेमाचा व्यवहार दिसतो. यात सख्यभाव स्पष्टपणे दृग्गोचर होतो. जेव्हा जेव्हा भरत नमस्कार करीत असे, तेव्हा तेव्हा श्रीराम त्याला हृदयाशी कवटाळत. भगवंतांचे असे वागणे सख्यभावच दाखविते.



# आत्मनिवेदन

भगवंतांचे तत्त्व, रहस्य, प्रभाव आणि महिमा जाणून ममतेने व निरहंकारीपणाने सगळे काही भगवंतांचेच आहे, असे समजून तन, मन,धन जनासहित स्वत:ला आणि संपूर्ण कर्मांना श्रध्दा आणि प्रेमाने भगवंतांना अर्पण करणे 'आत्मनिवेदन-भावरूप भक्ती' आहे.

भरतात आत्मनिवेदनाचा भावही कमी नव्हता. कारण तो स्वत:ला भगवंताला'समर्पित'च समजत होता. तुलसीकृत रामायणात भरत विलाप करीत कैकेयीच्या समोर पित्याला उद्देशून म्हणतो -

**चलत न देखन पायउँ तोही। तात न रामहि सौंपेहु मोही॥**

''हे तात ! आपण स्वर्गाला जातेवेळी मी आपणाला पाहू शकलो नाही. आणि आपण मला रामांच्या स्वाधीनही केले नाही.''

अशाच प्रकारे अध्यात्मरामायणात सांगितले आहे -

**हा तात क्व गतोऽसि त्वं त्यक्त्वा मां वृजिनार्णवे।**
**असमर्प्यैव रामाय राज्ञे मां क्व गतोऽसि भोः॥**

(अध्यात्म., अयोध्या.७/६६-६७)

''तात मला दु:ख-सागरात सोडून आपण कुठे गेलात ? हाय ! महाराज मला रामाला समर्पण केल्याशिवायच आपण कुठे गेला ?''

भरताच्या पश्चात्तापदग्ध बोलण्याने हे सिद्ध होते की, तो स्वत:ला श्रीरामाला 'समर्पित'च समजत होता.

तसेच त्यानंतरसुध्दा भरत 'हे राज्य आणि धन जे काही आहे, ते श्रीरघुनाथांचे आणि मी स्वत:सुध्दा त्यांचाच आहे, म्हणून हे सगळे त्यांचे त्यांना समर्पित करून मी त्यांची सेवा करीन' असाच भाव हृदयात

ठेवून, याच भावनेने चित्रकूटाला गेला. तिथे श्रीरामचन्द्रांना परतण्यासाठी खूप अनुनय, प्रार्थना केली. पण श्रीरामांनी कुठल्याही प्रकारे आपण परत येण्यास तयार नाही, असे म्हटले. एवढेच नाही, तर भरताला राज्य चालविण्याची सक्ती केली. "महाराज रामचंद्रांची आज्ञा पालन करणे हाच तुझा श्रेष्ठ धर्म आहे" असे गुरू वसिष्ठांनीही सांगितले. तेव्हा भरताने भगवंतांच्या जागी भगवंतांच्या चरण-पादुका समजून चरण पादुकांनाच सगळे राज्य अर्पण केले. एवढेच नव्हे तर स्वतःलाही अर्पण केले. चौदा वर्षांचा काळ लोटल्यावर भगवान अयोध्येला परतल्यानंतर ठेव म्हणून सांभाळलेले राज्य भगवंतांना सोपविले आणि स्वतःचे शरीरसुध्दा भगवंतांच्या चरणी अर्पण केले. भरत भगवंतांना शरण जाण्यातच आपले कल्याण समजून त्यांच्या आज्ञेचे पालन करीत असे. राज्यातील कुठल्याही गोष्टींवर तर सोडाच; पण स्वतःच्या शरीरावरसुध्दा तो स्वतःचा अधिकार समजत नसे. तो केवळ भगवंतांना आपले सर्वस्व मानून त्यांच्यावर अवलंबून राही. रामायण वगैरे सर्व शास्त्रे याला प्रमाण आहेत. या विषयाची खालील काही प्रमाणे आहेत.

भरत भारद्वाजास म्हणतो -

**मम राज्येन किं स्वामिन् रामे तिष्ठति राजनि।**
**किङ्करोऽहं मुनिश्रेष्ठ रामचन्द्रस्य शाश्वतः॥**
**अतो गत्वा मुनिश्रेष्ठ रामस्य चरणान्तिके।**
**पतित्वा राज्यसम्भारान् समर्प्यात्रैव राघवम्॥**

---------------------

**नेष्येऽयोध्यां रमानाथं दासः सेवेऽतिनीचवत्॥**

**(अध्यात्म. अयोध्या. ८/४९-५१)**

'स्वामी ! महाराज श्रीरामचन्द्र असताना मला राज्याचे काय प्रयोजन? मुनिश्रेष्ठ ! मी तर सदा रामचन्द्रांचा दास आहे. म्हणून मुनिनाथ ! मी श्रीरामांकडे जाऊन त्यांच्या चरणकमलांवर लोटांगण घालून सगळा राज्यभार त्यांच्यावर सोपवून लक्ष्मीपती श्रीरामांना अयोध्येला घेऊन येईन आणि अतितुच्छ दासाप्रमाणे त्यांची सेवा करीन.'

आत्मसमर्पणाचा भाव व्यक्त करताना भरत श्रीरामचन्द्रांना म्हणाला -

**कीन्ह सप्रेम प्रनामु बहोरी। बोले पानि पंकरुह जोरी॥**
**नाथ भयउ सुखु साथ गए को। लहेउँ लाहु जग जनमु भए को॥**
**अब कृपाल जस आयसु होई। करौं सीस धरि सादर सोई॥**

"प्रेमपूर्वक त्याने पुन्हा नमस्कार केला. आपले करकमल जोडून तो म्हणाला, हे नाथ ! मला आपल्याबरोबर जाण्याचे भाग्य लाभले. तसेच या जगात जन्म घेण्याचे भाग्य लाभले. हे दयानिधाना ! आता आपली जी आज्ञा होईल, ती मी शिरसावंद्य मानून त्याप्रमाणे करीन." नन्दिग्रामात राहताना तो मंत्र्यांना सांगत होता -

**ततो निक्षिप्तभारोऽहं राघवेण समागतः।**
**निवेद्य गुरवे राज्यं भजिष्ये गुरुवर्तिताम्॥**
**राघवाय च संन्यासं दत्त्वेमे वरपादुके।**
**राज्यं चेदमयोध्यां च धूतपापो भवाम्यहम्॥**

**(वा. रा. अयोध्या.११५/१९-२०)**

"श्रीरामचन्द्र भेटताच त्यांच्या सेवेत हे राज्य समर्पण केल्यानंतर माझा भार हलका होईल आणि मग मी त्यांची आज्ञा पाळून त्यांची सेवा करीन. माझ्याजवळ ठेव म्हणून असलेल्या या उत्तम पादुका, हे राज्य आणि अयोध्या श्रीरामांच्या चरणी समर्पित करून मी सर्व प्रकारच्या पापांपासून मुक्त होऊन विशुध्द होईन."

त्यानंतर श्रीरामचन्द्र अयोध्येस परत आल्यावर भरताने काय केले, ते सांगतात-

**पादुके ते तु रामस्य गृहीत्वा भरतः स्वयम्।**
**चरणाभ्यां नरेन्द्रस्य योजयामास धर्मवित्॥**
**अब्रवीच्च तदा रामं भरतः स कृताञ्जलिः।**
**एतत् ते सकलं राज्यं न्यासं निर्यातितं मया॥**
**अद्य जन्म कृतार्थं मे संवृत्तश्च मनोरथः।**

**(वा.रा. युद्ध. १२७/५४—५६)**

"नंतर धर्मात्मा भरताने स्वतःच्या हातात त्या दोन पादुका घेऊन श्रीरामचंद्रांच्या पायात घातल्या. त्यावेळी भरताने हात जोडून श्रीरामचंद्रांना निवेदन केले की, माझ्याजवळ ठेव म्हणून ठेवलेले हे तुमचे सगळे राज्य आज मी परत देत आहे. आज माझ्या जन्माचे सार्थक झाले. आणि माझे मनोरथ पूर्ण झाले."

अध्यात्मरामायणातही जवळ जवळ अशाच प्रकारचा प्रसंग आला आहे-

**भरतः पादुके ते तु राघवस्य सुपूजिते।**
**योजयामास रामस्य पादयोर्भक्तिसंयुतः॥**
**राज्यमेतन्न्यासभूतं मया निर्यातितं तव।**
**अद्य मे सफलं जन्म फलितो मे मनोरथः॥**

(युद्ध. १४/९३-९४)

"त्यानंतर भरताने त्या अत्यंत प्रेमाने पूजन केलेल्या पादुका भक्तिभावाने श्रीरामचंद्रांच्या पायात घातल्या आणि म्हणाला -"प्रभो ! मला ठेव म्हणून दिलेले आपले हे राज्य मी पुन्हा आपल्याला परत देतो. आज माझा जन्म कृतार्थ झाला. आणि माझ्या सगळ्या मनोकामना पूर्ण झाल्या."

महाभारतातही सांगितले आहे की,

**तस्मै तद् भरतो राज्यमागतायातिसत्कृतम्।**
**न्यासं निर्यातयामास युक्तः परमया मुदा॥**

(वन. २९१/६५)

"भरताने ठेव म्हणून ठेवलेले राज्य वनातून परत आलेल्या त्या श्रीरामचन्द्रांना मोठ्या आनन्दाने अत्यंत सत्कारपूर्वक सोपविले."

वस्तुतः भरताचे सगळे जीवनच मूर्तिमंत आत्मसमर्पण आहे. त्याचे सगळे कार्य श्रीरामांसाठीच असे. रामांची प्रीती आणि प्रसन्नता हेच त्याच्या जीवनाचे मुख्य आणि नित्य लक्ष्य होते. कारण भरतामध्ये नवविधा भक्तीशिवाय प्रेमलक्षणाभक्तीसुद्धा पूर्णपणे विद्यमान होती. ते प्रेमाची जिती-जागती मूर्ती होती. म्हणूनच भरद्वाज मुनींनी म्हटले होते-

**तुम्ह तौ भरत मोर मत एहू। धरें देह जनु राम सनेहू॥**

"हे भरता ! माझे तर मत असे आहे की, तू जणू देहधारी रामावरील प्रेमच आहेस."

इतके सगळे असूनही भरत स्वत:च्या ठिकाणी कुठलेच गुण पाहात नसे. तो स्वत:ला विषयी, कपटी, कुटिलच मानी. वास्तविक सगळे काही सहजतेने समर्पित झाले आहे आणि असेच वाटते की, काही केलेच नाही. भरत असाच होता.

भरताच्या या विलक्षण आत्मनिवेदन भक्तीला आदर्श समजून चालणारा पुरुष धन्य होऊ शकतो.



# उपसंहार

आतापर्यंत भक्तीचे नऊ प्रकार सांगितले आहेत. त्यांना तीन भागात वाटावयास हवे. पहिल्या तीन—श्रवण, कीर्तन आणि स्मरण-भक्ती ही उपास्यदेवाच्या अनुपस्थितीतही केली जाते. दुसऱ्या तीन—पादसेवन, अर्चन आणि वन्दन-भक्ती पूर्णपणे भगवंत भेटल्यावरच होते. पण भगवंताच्या अनुपस्थितीतही मनातल्या भावनेने त्यांना प्रत्यक्ष समजून अनुष्ठान केले जाते.

हे भक्तीचे सहा प्रकार क्रियारूप आहेत. उरलेले तीन-भक्तीचे प्रकार—दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन-भक्ती भावरूप आहे. कारण त्यात भावानुरूप क्रिया होऊनही भावाचीच प्रधानता असते. भक्तीत प्रेमभाव व्यापक स्वरूपात आहे. म्हणून क्रियारूप भक्तीसोबत उत्कट भाव असल्यास ती भावरूप होते.

बरेचसे भक्त लोक श्रवणाला-सत्संगाचे कीर्तनाला-भजनाचे आणि स्मरणाला-ध्यानाचे रूप देतात. कारण या तिघांचा त्याच्याशी परस्पर गाढ सम्बन्ध आहे. म्हणून तिघांना एका समूहात घेतले आहे. त्यातही झाडाच्या मुळाशी पाणी शिंपडल्याप्रमाणे सत्संग भजन-ध्यानाला पोषक आहे. या तिघांमधून एकाचे अनुष्ठान केल्यासही परमात्म्याची प्राप्ती

होऊ शकते. जसे श्रवणामुळे परीक्षित वगैरे, कीर्तनामुळे नारद वगैरे आणि स्मरणाने धुव्र वगैरेंना परमात्मा प्राप्त झाला. मग तिघांचे एकाचवेळी अनुष्ठान केल्याने परमात्मा प्राप्त होईल, यात काय सांगावे !

अशाच प्रकारे पादसेवन, अर्चन आणि वन्दन यांना एका समूहात ठेवले आहे. कारण भगवंतांची चरण-सेवा, पूजा आणि नमस्कार या तिघांचा चरणांशी विशेष संबंध आहे. या तिन्हीमधून एक केल्यानेही भगवंतांची प्राप्ती होऊ शकते. जसे पादसेवनामुळे नावाड्याला, अर्चनाने पृथू वगैरेंना आणि वन्दनाने अक्रूर वगैरेंना भगवंतांची प्राप्ती झाली. मग एकाचवेळी तिन्ही केल्यास भगवंताची प्राप्ती होईल, यात काय शंका !

याचप्रमाणे दास्यभाव, सख्यभाव आणि आत्मनिवेदनभाव या तीन भावरूपाने अनुष्ठान करण्यायोग्य आहेत. म्हणून या तिन्हीत एकता आहे. हे तिन्ही भाव एकाच ठिकाणी असू शकतात आणि वेगवेगळेही असू शकतात. या तिन्हीमधून कुठल्याही एका भावाने सुध्दा भगवंतांची प्राप्ती होऊ शकते. जसे दासभावाने हनुमंत वगैरे, सखाभावाने अर्जुन वगैरे आणि आत्मनिवेदन-भावाने बळी वगैरेंना भगवंतांची प्राप्ती झाली. मग सर्वभाव ठेवून उपासना केल्यास भगवंतांची प्राप्ती होईल, हे सांगणेच नको.

म्हणूनच आम्हांला श्रध्दा प्रेम आणि निष्काम भावाने अत्यंत उत्साहाने व तत्परतेने भगवंतांची भक्ती करावयास हवी



जो क्रोधामध्ये येऊन अथवा एखाद्या प्रसंगाने दुःखी होऊन आत्महत्या करतो, तो दुर्गतीला जातो अर्थात् भूत-प्रेत-पिशाच बनतो. आत्महत्या करणारा महापापी असतो कारण हे मनुष्यशरीर भगवत्प्राप्तीसाठी मिळाले आहे म्हणून महान् भगवत्प्राप्ती न करता आपल्याच हाताने असे मनुष्यशरीर गमावणे फार मोठे पाप आहे, अपराध आहे, दुराचार आहे. दुराचाऱ्याची सद्गती कशी होईल? म्हणून मनुष्याने आत्महत्या करण्याचा विचार कधीही मनात येऊ देऊ नये.

**—दुर्गतीपासून बचाव करा पुस्तकातून**

××× ××× ×××

बदला घेण्याची भावना ठेवणे अयोग्य आहे, चूक आहे. तो तर आमच्या कर्मांचे फल भोगवून आपणाला पवित्र करीत आहे. म्हणून जर तुम्हाला बदला घ्यावयाचाच असेल तर सर्वात प्रथम त्याची सेवा करा. जो दुःख देण्याचा प्रयत्न करतो, तो (पापांचे फल भोगवून) तुम्हाला. शुद्ध करीत आहे, तुमच्यावर उपकार करीत आहे. त्याचा बदला जर घ्यावयाचा असेल, तर आपल्या तन, मन, वचन, धन, विद्या, योग्यता, पद, अधिकार यांनी त्याची सेवा करावी, त्याला सुखी करावे.

**—नित्ययोगाची प्राप्ती या पुस्तकातून**

××× ××× ×××

गृहस्थी माणसाने धन कमावण्यापेक्षा मुलांच्या चारित्र्याकडे अधिक लक्ष द्यावे, कारण कमाविलेले धन मुलेच उपयोगात आणतील. जर मुले बिघडून जातील तर धन त्यांना त्याहीपेक्षा अधिक बिघडवील. या विषयात शहाण्या माणसांचे असे म्हणणे आहे—"पूत सपूत तो क्यों धन संचै? पूत कपूत तो क्यों धन संचै?" अर्थात् पुत्र सपूत असेल तर त्याला धनाची कमी राहणार नाही आणि कपूत असेल तर संचय केलेले धन सर्व नष्ट करून टाकील, मग धनाचा संचय कशाला करावा?

**—गृहस्थाश्रमात कसे रहावे या पुस्तकातून**

॥ श्रीहरिः ॥

# गीताप्रेस, गोरखपुरसे प्रकाशित कुछ मराठी पुस्तकें

| कोड | पुस्तक | कोड | पुस्तक |
|---|---|---|---|
| 391 | गीता-माधुर्य | 1330 | माझा अनुभव |
| 429 | गृहस्थाश्रमात कसे वागावे? | 1334 | भगवंतांची पाच निवास स्थाने |
| 881 | भगवत्प्राप्तीची सुगमता | 1335 | रामायणातील काही आदर्श व्यक्तिमत्त्वे |
| 883 | मूर्तिपूजा | 1339 | कल्याणाचे तीन सोपे मार्ग आणि सत्याच्या स्वीकृतीने कल्याण |
| 884 | संततीचे कर्तव्य | 1340 | अमृत-बिन्दु |
| 885 | तात्त्विक प्रवचन | 1341 | तत्त्वप्राप्तिचा सहज आणि सरल उपाय |
| 886 | साधकांसाठी | 1382 | बोधप्रद अकरा गोष्टी |
| 898 | भगवन्नाम | 1383 | भक्तराज हनुमान |
| 1006 | वासुदेवः सर्वम् | 1384 | सती-सावित्री-कथा |
| 1074 | आध्यात्मिक पत्रावली | 1385 | नल-दमयंती |
| 1099 | बहुमूल्य वेळेचा सदुपयोग | 1387 | प्रेमात विलक्षण एकता |
| 1155 | उद्धार कसा होईल? | 1388 | श्रीमद्भगवद्गीता-श्लोकार्थसहित |
| 1168 | भक्त नरसी मेहता | 1578 | मानवमात्राच्या कल्याणासाठीं |
| 1170 | आपले कर्तव्य उठा, जागे व्हा | 1642 | प्रेम-दर्शन |
| 1171 | गीता-अध्ययनाचे लाभ आणि दुःखनाशाचे उपाय | | |
| 1210 | जेथे पहावे तेथे तूच | | |
| 1276 | आदर्श स्त्री सुशीला | | |
| 1279 | सत्संगाविषयी काही महत्त्वाच्या गोष्टी | | |